

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका







मराठी अभ्यास परिषद पत्रिका

# भाषा आणि जीवन

वर्ष १९ : अंक १ हिवाळा २००१

अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका



---

**प्रकाशन : त्रैमासिक** (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)

**संपादन - समिती :** मृणालिनी शहा (प्रमुख), अशोक रा. केळकर, गं. ना. जोगळेकर, मॅक्सीन बर्न्सन, प्र. ना. परांजपे, द. दि. पुंडे, आशा मुंडले, अंजली सोमण, विजया देव, नीलिमा गुंडी

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** मृणालिनी शहा, १, शीतल अपार्टमेंट, ४६/४, एरंडवणे, पुणे ४११ ००४. दू. क्र. ५४३३८६९

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. दू. क्र. ४४८६०१५

**पत्रिकेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.



---

**संपादक :** मृणालिनी शहा, **प्रकाशक व मुद्रक :** मराठी अभ्यास परिषदेसाठी नीलिमा गुंडी

**मुद्रण स्थळ :** पद्मरेखा आर्टस्, १९४/२, नवी पेठ, पुणे ४११ ०३०.

# संपादकीय

## मराठी बिघडविण्याचा 'आकाश (वाणी) मार्ग'

सध्या मराठी बिघडविण्याचा कार्यक्रम अनेक तऱ्हांनी सुरू आहे. रोजच्या वृत्तपत्रांमध्ये मराठीची चुकीची रूपे आढळत असल्याची तक्रार आजची नाही, गेल्या तीस-चाळीस वर्षांपासून ती होतच आहे. वृत्तपत्रविद्येचे विभाग ज्या काही विद्यापीठांमध्ये आहेत तेथील अनुभवी व जाणते प्राध्यापक आपल्या विद्यार्थ्यांना शब्दलेखनाबाबत होणाऱ्या चुका कोणत्या ते सांगत असतातच. पण वृत्तविद्येची पदवी धारण करणारे ठिकठिकाणचे पत्रकार भाषेच्या उपयोगाबाबत जागरूकता दाखवत आहेत, असे दिसत नाही. वार्ता लिहिणारे, संगणकावर अक्षरजुळणी करणारे आणि मुद्रिते तपासणारे यांच्यामध्ये असावा तसा मेळ नसल्यामुळे असे घडणे अटळ आहे. ज्येष्ठ पत्रकार पुरुषोत्तम धाक्रस यांनी दोन वर्षांपूर्वी 'भाषेच्या अराजकातून फेरफटका' या शीर्षकाचा दीर्घ निबंध लिहून अशा चुकांची सविस्तर चर्चा केली होती. तो निबंध नव्या पत्रकारांनी जरी काळजीपूर्वक अभ्यासला तरी अज्ञान आणि उदासीनता यांमुळे होणाऱ्या चुका टळू शकतील. 'मराठी लेखनकोशा'सारख्या पुस्तकांचे साहाय्य घेण्याची सवय लावली तरी परिस्थितीत सुधारणा होऊ शकेल.

गावागावांमधील दुकानांच्या पाट्या, शासकीय कार्यालयांमधील मराठीतील सूचनाफलक, दूरदर्शन किंवा इतर वाहिन्यांच्या कार्यक्रमांची श्रेयनामावली या ठिकाणी दिसणाऱ्या मराठीच्या चुकीच्या रूपांबद्दलही अनेकवार लिहिले-बोलले जात असते. वस्तुतः अशा चुकांचे मूळ जिथे असते तिथे त्या टाळण्याचे उपाय योजता येतील. पण या साध्या गोष्टीकडेही संबंधित व्यक्ती लक्ष देत नाहीत. कोपऱ्या कोपऱ्यावर असलेल्या किराणा मालाची दुकाने बहुधा अमराठी लोकांची असल्याने त्यांनी मराठीच्या शुद्धतेची पर्वा न करणे स्वाभाविकच म्हटले पाहिजे. इथे नुसते शब्दांचे लेखन चुकीचे असते असे नव्हे, तर त्यात अमराठी शब्दांचाही भरणा असतो. त्यामुळे 'चना दाल', 'मुंग दाल', 'काला तिल' असले शब्द ठाण मांडून बसलेले दिसतात.

मराठी संबंधीच्या अनास्थेची ही नेहमीची ठिकाणे सोडून मराठी

बिघडविण्याच्या आणखी एका केंद्राकडे लक्ष देणे आवश्यक आहे. ते केंद्र आहे 'आकशवाणी'! पूर्णपणे शासकीय नियंत्रण असलेले हे प्रसारमाध्यम आजही प्रभावी आहे. गेल्या काही वर्षांमध्ये प्रत्येक जिल्ह्यागणिक कमीजास्त क्षमतेची आकाशवाणी केंद्रे नव्याने सुरू झाली आहेत. नागपूरपासून गोव्यापर्यंत आणि मुंबईपासून नांदेडपर्यंत ठिकठिकाणी ही केंद्रे असल्यामुळे त्या त्या केंद्रातील भाषेच्या रूपांमध्ये फरक असल्यास नवल नाही. मात्र बहुतेक सर्व केंद्रामध्ये निवेदन सामान्यतः प्रमाण मराठीत केले जाते असे दिसून येते.

महाराष्ट्रातील आकाशवाणीकेंद्रामध्ये इंग्रजी आणि हिंदीचे वर्चस्व कमालीचे आहे. दर तासाला हिंदी-इंग्रजी बातम्या महाराष्ट्रभरच्या केंद्रांवरून प्रसारित होत असतात. इंग्रजी-हिंदीत इतर कार्यक्रम होत असतात. ते 'राष्ट्रीय कार्यक्रम' असल्यामुळे त्यांना कधी धक्का लागत नाही. (जणू काही मराठी सारख्या 'प्रादेशिक भाषा' राष्ट्रीय कार्यक्रम सादर करण्यास असमर्थ आहेत!) दिवसभर त्याच त्या बातम्या महाराष्ट्रामधील आक़ाशवाणी केंद्रे प्रसारित करीत असतात. हिंदी भाषक प्रदेशांत अनेक केंद्रे फक्त हिंदी बातम्या ऐकवतात आणि दक्षिण भारतातील अनेक केंद्रांमध्ये फक्त इंग्रजी (आणि ती ती प्रादेशिक भाषा) बातम्यांना स्थान असते, हे आपल्या केंद्रशासनाच्या धोरणाला धरूनच आहे. म्हणजे जिथे मऊपणा आहे तिथे कोपराने खणा आणि जिथे विरोध आहे तिथे गुडघे टेका! दर तासाला महाराष्ट्रात मराठीतून बातम्या प्रसारित कराव्या अशी मागणी कुठल्या मराठी खासदाराने केल्याचे कुणी ऐकले आहे काय?

हिंदी-इंग्रजीच्या तुलनेने मराठीतील बातम्यांचे प्रसारण अत्यल्प प्रमाणात होत असते. मुंबई-पुणे-नागपूर-औरंगाबाद या महाराष्ट्रातील प्रमुख केंद्रावरून स्वतंत्रपणे प्रादेशिक बातम्या सांगितल्या जातात. त्या त्या केंद्रांच्या कक्षेमधील जिल्ह्यांसंबंधी जिल्हा वार्तापत्रही ही केंद्रे प्रसारित करीत असतात. प्रादेशिक बातम्या किंवा जिल्हा वार्तापत्रे यांमधील मराठीबद्दल तक्रार करण्यासारखे फारसे काही नाही. जे काही आहे त्याचे मूळ दिल्लीच्या बातम्यांमध्ये असल्याचे जाणवते.

दिल्ली आकाशवाणीवरून सर्वच भारतीय भाषांमध्ये ठराविक वेळी बातम्यांचे प्रसारण होत असते. मराठीच्या वाट्याला सकाळी साडेआठ, दुपारी दीड आणि रात्री आठ वाचून पाच मिनिटे, या वेळा आल्या आहेत. पूर्वी फक्त सकाळी आणि रात्री बातम्या दिल्या जात आणि त्यांचा अवधी पंधरा मिनिटांचा असे. गेल्या तीस वर्षांपासून दुपारच्या बातम्या सुरू झाल्या आणि सर्व बातमीपत्रांचा कालावधी

मात्र दहा मिनिटांचा करण्यात आला. हिंदी-इंग्रजीच्या पाठोपाठ या बातम्यांची वेळ असली तरी त्यात बरेचदा शिळेपणा असतो. त्यालाही काही कारणे असतील.

निदान गेल्या साठ वर्षांपासून मराठी बातम्यांचे हे प्रसारण चालू आहे. मराठी विभागात अनंत जोशी, नरेश कवडी यांच्यापासून अनेकांनी बातमीपत्रांचे निवेदक म्हणून काम केले. निर्दोष आणि स्पष्ट उच्चारण, योग्य वाक्यरचना आणि निवेदनातील आवश्यक असा चढउतार, भाषेचे लिखित रूप येऊ न देता बोली रूप जपण्याची रीत, यांमुळे प्रत्येक निवेदनाचे वाचन लक्षात राहण्यासारखे होत असे. मराठीचे प्रमाण उच्चारण म्हणून या निवेदकांचा निर्देश करण्यासारखी तेव्हा स्थिती होती. गेल्या दहा-पंधरा वर्षांमध्ये ही स्थिती पुष्कळच बदलली असल्याचे जाणवते. तसा आजचा मराठी निवेदकांचा आठ-दहा जणांचा ताफा वाईट नाही. अनेक निवेदक-निवेदकांचे आवाज आणि बातम्या सांगण्याची शैली यांतही असमाधान वाटावे असे काही नाही. तरीही सध्याच्या या बातम्या ऐकताना आपण मराठी ऐकत आहोत, की एखादी भेसळ भाषा ऐकत आहोत असा प्रश्न पडतो. तक्रार करायची आहे ती खटकणाऱ्या शब्दयोजनेबद्दल. या सर्व निवेदकांना मूळ इंग्रजीवरून किंवा हिंदीवरून भाषांतर करून मराठी बातम्या तयार कराव्या लागतात. याचा अर्थ त्यांना हिंदी-इंग्रजीचे चांगले ज्ञान पाहिजे आणि मुख्य म्हणजे मराठी वळणाचे भाषांतर म्हणजे काय यावर प्रभुत्व पाहिजे. हे सर्व तपासणारा कुणीतरी तज्ज्ञ परीक्षक पाहिजे. अशी व्यवस्था नसल्यामुळे इंग्रजी वळणाचे कृत्रिम शब्द आणि अनेक हिंदी शब्द घुसवून मराठी बातम्या बनविल्या जात आहेत. त्याचा परिणाम म्हणून (बातम्यांमधील शब्द - 'फलस्वरूप'!) कोणत्या प्रकारचे मराठी ऐकावे लागते, ते लक्षात घेण्यासारखे आहे.

"या प्रश्नाचा नव्याने विचार केला जाईल असे प्रधानमंत्र्यांनी 'संकेत दिले'." वस्तुतः पंतप्रधानांनी सुचविले किंवा सूचित केले असे म्हणायला पाहिजे. ('पंतप्रधान' या मराठीतील रूढ शब्दाची हकालपट्टी या प्रधानमंत्र्यांनी केली त्याचे 'संकेत' केव्हा मिळाले हे कळलेही नाही!) हे 'संकेत दिले किंवा मिळाले' प्रकरण आता सगळ्या वृत्तपत्रांमधून प्रस्थ होऊन बसले आहे. 'चिन्हे दिसत आहेत, लक्षणे दिसतात' हे मराठी वळण आता कुणाला माहीत नसावे. हेच प्रधानमंत्री स्वातंत्र्यदिनाच्या 'पूर्वसंध्येला' राष्ट्राला 'संबोधित' असतात आणि लोकांचे 'देशाप्रती' काय कर्तव्य आहे ते 'समजावीत' असतात. असले भेसळीचे वाक्य ऐकविण्याऐवजी हे निवेदक सरळ हिंदी बातम्याच का देत नाहीत, असा प्रश्न

पडतो. हिंदीचे हे आक्रमण मराठी भाषकांनी स्वतः होऊन ओढवून घेतले आहे. मराठीसंबंधीचे अज्ञान यात आहेच पण हिंदी शब्द बेधडक वापरून वेळ मारून नेण्याचा निर्ढावलेपणाही येथे दिसून येतो.

"स्वातंत्र्यदिनाच्या आदल्या दिवशी (अगदी 'संध्याकाळीच' कशाला पाहिजे? खरे म्हणजे स्वातंत्र्यदिनाच्या प्रसंगी किंवा निमित्ताने म्हणायला नको का?) पंतप्रधानांनी राष्ट्राला उद्देशून भाषण केले आणि देशाबद्दल आपले काय कर्तव्य आहे ते समजावून सांगितले", असे साधे मराठी वाक्य लिहावेसे का वाटू नये? अज्ञान आणि बेपर्वा वृत्ती हेच याचे कारण. हिंदीच्या अनुकरणाने समजावून सांगणे ऐवजी समजावणे हे रूप सर्वत्र दिसत आहे. मराठीत समज देणे, समजूत घालणे/काढणे, समजावून सांगणे ही भिन्न अर्थच्छटा व्यक्त करणारी वेगवेगळी क्रियापदे आहेत, हे कुणी ओळखायचे? 'समजावणे'मुळे नको तो अर्थ मात्र व्यक्त होत असतो. देशाबद्दलचे किंवा देशासंबंधीचे कर्तव्य याऐवजी देशाप्रती म्हटल्याने आणि भाषेचे साधे रूप टाकून मुद्दाम कृत्रिम रूप स्वीकारल्याने काय साध्य होते? मराठी बेढब बनते इतकेच.

मागल्या पिढीतले निवेदक बातम्या सांगत असत त्यांनाही भाषांतर करूनच मराठी मजकूर तयार करावा लागत असे. पण त्यांना समर्पक, अर्थवाही, साध्या सरळ मराठी शब्दांची वाण पडत नसे. ज्येष्ठ निवेदिका सुधा नरवणे किंवा सुनंदा कोगेकर यांच्या काळापर्यंत मराठी वळण सांभाळण्यावर कटाक्ष असे. तसे पाहिले तर गद्य विधानाचे नेमके गद्य भाषांतर करण्यात कठीण असे काय आहे? खरेतर त्याच त्या स्वरूपाच्या राजकीय किंवा सामाजिक बातम्या रोज द्यायच्या असतात. व्यक्ती किंवा ठिकाण यांत काय बदल होईल तेवढाच. म्हणजे अगदी अनपेक्षित असा आशय मराठीत कसा आणायचा हाही प्रश्न नसतो. आपल्या कामाबद्दल हे निवेदक 'सतर्क' राहात नाहीत हेच खरे. 'सतर्क' हा आणखी एक बेंगरूळ शब्द. दक्ष, जागरूक हे अर्थपूर्ण शब्द मराठीत रूढ असताना ही 'सतर्क'ची उसनवारी कशासाठी?

'स्थित' हा असाच आणखी एक भयंकर शब्द. 'दिल्लीस्थित', मुंबईस्थित अशा शब्दांचा सध्या बातम्यांमध्ये सुळसुळाट झालेला दिसतो. दिल्ली येथील, मुंबईच्या असे नीट म्हणता येत असताना 'स्थित'चा वेढा कशासाठी?

" 'भूकंपाने प्रभावित' जनतेची मदत करण्यासाठी सैनिक तैनात करण्यात आले आहेत" असले वाक्य म्हणजे मराठी बेतालपणाने कशी 'प्रभावित' झाली

आहे ते सांगणे होय. मराठीत प्रभावित हा शब्द वेगळ्या प्रकारे रूढ आहे. विनोबा गांधींच्या अहिंसेच्या तत्त्वज्ञानाने 'प्रभावित झाले' हे योग्य म्हणता येईल. पण "भूकंपाचा परिणाम अनुभवणाऱ्या (किंवा सरळ भूकंपग्रस्त) जनतेला मदत करण्यासाठी सैनिकांची योजना झाली आहे" (किंवा नेमणूक झाली आहे किंवा सैनिकांना बोलावण्यात आले आहे) असे मराठी भाषांतर करायला काय हरकत आहे? 'एखाद्याला' 'मदत करायची की' 'एखाद्याची' मदत करायची यावरही मराठीपण अवलंबून आहे. 'दुष्काळाचा सामना' हे रूप चुकीचे असून 'दुष्काळाशी सामना' (किंवा लढा) हे निदान मराठी मातृभाषा असलेल्याला कळले पाहिजे.

'द्विपक्षीय करार' हेही एक शाब्दिक भाषांतरातून उद्‌भवलेले जाचक प्रकरण. रोजच्या रोज वेगवेगळ्या राष्ट्रांचे प्रतिनिधी किंवा नेते भेटतात. त्यांच्यात काही बोलणी होतात, वाटाघाटी होतात आणि शेवटी काही निर्णयही घेतले जातात. हा करार त्या दोन देशांमधला आणि दोन देशांपुरता असतो. त्याला दोन देशांच्या 'आपसातील करार' म्हणायचे सोडून हा 'द्विपक्षीय'चा बोजडपणा कशासाठी? Bilateral साठी हिंदीवाले हा कृत्रिम शब्द स्वीकारतात म्हणूनच ना?

गेल्या पाच-सहा वर्षांपासून आकाशवाणीच्या बातम्यांमध्ये 'कथित' शब्द वारंवार ऐकू येत आहे. "मंत्र्यांनी कथित गैरप्रकारांचे स्पष्टीकरण केले." यासारख्या वाक्यात हा शब्द योजला जातो. इंग्रजी Alleged साठी 'कथित' हा शब्द हिंदीत प्रचारात आहे. असे विधान की जे पुराव्याने सिद्ध झालेले नाही, त्या संदर्भात (Statement without proof) हा शब्द येतो. वस्तुतः मराठीत या प्रकाराला 'बोलवा' हा शब्द योजणे योग्य होईल. "भ्रष्टाचार झाल्याची बोलवा आहे" हे मराठी वळणाचे वाक्य होईल. पूर्वीपासून मराठीत 'असे म्हणतात', 'असे सांगतात' ही वाक्ये याच कारणासाठी योजली जातात. या 'कथित'मुळे मराठी अकारण बोजड आणि कृत्रिम बनली आहे.

आपल्या भाषेचे सौष्ठव आणि सौंदर्य मुख्यतः शब्दयोजनेत आणि वाक्यरचनेत असते, हे ओळखले नाही तर मराठी बेढब व्हायला वेळ लागत नाही. गेल्या पन्नास वर्षांमध्ये 'समारोह', 'योगदान', 'प्रार्थनीय', 'संपन्न', 'पारित' अशा मूळच्या संस्कृत पण हिंदीमार्गे आलेल्या अनेक शब्दांनी मराठीत भेसळ शिरली आहे, याला मराठी समाजच जबाबदार आहे. आता तर 'कमी', 'जरूरी' या शब्दांचे व्याकरण हिंदीमुळे बिघडत आहे. मराठीत 'कमी' हे विशेषण असले तरी हिंदीत ते नाम आहे. "अध्यक्ष सभास्थानी येण्याचीच कमी आहे" असल्या वाक्यात

मराठीतही अज्ञानाने ‘कमी’ शद्ब नाम बनून येत आहे. ‘जरूरी’ हे मराठीतले नाम; पण ते आता हिंदीच्या पद्धतीने खुशाल क्रियाविशेषण म्हणून वापरणे सुरू झाले आहे. (उदा. “हे सांगणे जरूरी आहे”) हे आक्रमण आपणच ओढवून घेत आहोत.

ही सगळी नमुन्यादाखल काही उदाहरणे झाली. आणखीही कितीतरी नमुने सांगता येतील. आता रोजच्या रोज रेडिओच्या बातम्या कितीजण ऐकतात मग त्यातल्या चुका एवढ्या कशाला मनावर घ्यायच्या असे कुणी म्हणेल. त्याला उत्तर एवढेच की, आजही ठिकठिकाणचे हजारो लोक या बातम्या ऐकत असतात आणि मुख्य म्हणजे दिल्ली आकाशवाणीचा मराठी विभाग हे बिघडलेल्या मराठीचे निश्चित बोट दाखविता येईल, असे केंद्र आहे. तेच जर सुधारले तर ‘मराठी वाचवा’ ही घोषणा प्रत्यक्षात आणल्यासारखे होईल. मात्र सरकारी यंत्रणा अशा लेखांची दखल घेईल आणि सुधारणा घडवून आणील, अशा भ्रमात मी नाही. संबंधित अधिकारी ‘मराठी सुधार योजनेला’ ‘सर्वोच्च प्राथमिकता’ देतील अशी आशा करायला काय हरकत आहे?

■

**गं. ना. जोगळेकर**
२२, **मनीषा सोसायटी, कर्वेनगर, पुणे** - ४११ ०५२

---

**मुखपृष्ठाच्या चित्रावरून आठवणाऱ्या ओळी**

“ कुठुन येते इतकी समजूत या झाडांना
गळतानाही सगळीं पाने आसू नाही ”

- मंगेश पाडगावकर



अनुक्रमणिका








# भारतीय भाषांमधील इतर मामा : एक शोध

पंचानन महांती

## १. प्रास्ताविक

'इतर मामा' म्हणजे ज्या मनुष्यप्राण्यांना अथवा मनुष्येतर प्राण्यांना 'मामा' म्हटले जाते ते, असे येथे मला अभिप्रेत आहे. इतर भारतीय भाषांमधील शद्व असे दाखवितात की वाघ, चंद्र, उंदीर आणि पोलीस यांना 'मामा' ही संज्ञा लावली जाते. तसे, या चारांमध्ये त्यांना मामा म्हणावे असे कोणतेही साम्य नाही, तरीदेखील त्यांना 'मामा' म्हटले जाते हे जरा विचित्रच दिसते. या निबंधात याच संदर्भात चर्चा करून या प्रश्नाचे काही समाधानकारक स्पष्टीकरण मिळते का ते पाहण्याचा मी प्रयत्न करणार आहे.

पण त्यापूर्वी 'मामा' ही संज्ञा भारतीय भाषांमध्ये कोणकोणत्या अर्थांनी वापरली जाते आणि भारतीयांच्या सामाजिक जीवनात या 'मामां' ची काय भूमिका आहे ते जाणून घेतले पाहिजे, म्हणजे मग या प्रश्नाचा पुरता आवाका आपल्या लक्षात येईल. तेव्हा प्रथम मी या बाबींचा ऊहापोह करीन आणि मग त्या पार्श्वभूमीवर उपरोक्त प्रश्नांची चर्चा करीन.

## २. भारतीय भाषांमधील 'मामा'

काळाच्या ओघात इतर गोष्टी बदलल्या तरी भाषेतील नातेदर्शक संज्ञांमध्ये फार मोठे बदल होत नसतात, ही गोष्ट सर्वमान्य आहे. तीच गोष्ट नाती व्यक्त करण्याच्या पद्धतीचीही आहे. उदाहरणार्थ, आज इंग्रजी आणि ओरिया या भाषा बोलणारे लोक सुमारे चार हजार वर्षांपूर्वी एकमेकांपासून दूर झालेले असले तरी रक्ताची नाती दाखविणाऱ्या बाप, आई, भाऊ, बहीण, मुलगा, मुलगी यांसारख्या शद्वांमध्ये त्या भाषांमध्ये फार मोठे साम्य आढळून येते. पण त्याचवेळी याच भाषांमधील विवाहांतून निर्माण झालेल्या नातेदर्शक संबंधांमध्ये मात्र लक्षात येण्यासारखा फरक पडला आहे असे दिसून येते. असा फरक का पडला असावा, या प्रश्नाचे उत्तर शोधण्यासाठी आपल्याला गेल्या चार हजार वर्षांमध्ये या समाजामध्ये कोणकोणते बदल घडून आले त्याचा विचार करावयास हवा. त्यासाठी प्रथम आपण प्रोटो-इंडो-युरोपियन (PIE) नातेदर्शक संरचनेचे

अवलोकन करूया.

या संरचनेत 'पितृसत्ताक कुटुंबपद्धती होती आणि त्यांच्यात पैतृक वंशपरंपरा होती' असे फ्रायडरीच (१९७९:२०७) म्हणतो. प्रोटो इंडो-युरोपियन सामाजिक संरचनांचे असे विश्लेषण केल्यानंतर फ्रायडरीचने असाही निष्कर्ष काढला आहे की, 'वधू पळवून आणणे. वधूची संपत्ती असणे, बहुपत्नीत्वाची चाल, पतीचे प्रभुत्व, पतीला विवाहबाह्य स्त्री असणे आणि मानलेली मुलगी असणे' या सगळ्या संकल्पना पितृसत्ताक कुटुंबपद्धती आणि पैतृक वंशपरंपरा याच बाबींकडे लक्ष वेधतात. एवढेच नव्हे तर या लोकांमध्ये गोत्राबाहेर विवाह करण्याची पद्धत (exogamy) होती आणि कुटुंबातल्या प्रत्येक व्यक्तीने परकीय समाजातील अनोळखी व्यक्तीशी एक तरी विवाह करावा अशी अपेक्षा केली जाई. तसेच लग्नानंतर स्त्री आपल्या माहेरच्या कुटुंबाची एक घटक म्हणून तिला वागवले जाई. या सर्व कारणांमुळे इंडो-युरोपियन भाषांमध्ये विवाहोत्तर होणाऱ्या नातेदर्शक संबंधामध्ये खूप विविधता दिसून येते. त्यातले अत्यंत ठळक उदाहरण म्हणजे प्रोटो-इंडो-युरोपियन भाषांमधली 'अवोस' (awos) ही संज्ञा आहे. तिचे आजोबांपासून ते मामापर्यंत विविध अर्थ होतात. लॅटिनमध्ये आजोबांसाठी 'अवुस' असा शब्द आहे, तर नामासाठी 'अवुस'पासूनच बनलेला 'अवुंकुलूस' असा शब्द आढळतो. 'अवुस' चा मूळ अर्थ 'आईचे वडील' असा होता आणि त्यामुळेच आईच्या भावाला 'अवुंकुलुस' असे म्हटले जाई असे काही विद्वान म्हणतात. पण एमिल बांव्हनिस्तने (१९७९ : १८२-३) हे स्पष्टीकरण फेटाळून लावताना असे दाखविले आहे की 'अवुस'चा अर्थ 'आईचे वडील' असा होतो, हे दाखविणारा कोणताही पुरावा आढळत नाही, उलट आहेत ते सर्व पुरावे हा शब्द पैतृक परंपरेशी संबद्ध होता असेच दाखवतात. 'आईचा भाऊ' यासाठी 'अवुस मॅटर्नस' अशी विशिष्ट संज्ञा वापरली जाई असे बांव्हनिस्त म्हणतो. त्याच्या या विधानाला बळकटी देणारा पुरावा हिटाईट भाषेत आढळतो. त्या भाषेत 'हुह्हास' ही संज्ञा केवळ 'वडिलांचे वडील' याच अर्थाने वापरली जाते आणि हुह्हासची व्युत्पत्ती 'अवोस'मध्ये आहे. बांव्हनिस्त असेही सांगतो की प्रोटो-इंडो-युरोपियनसारख्या वर्गीकरणात्मक नातेदर्शक पद्धतीत आईच्या वडलांना काही खास महत्त्व असण्याचे कारणच नव्हते. पितृवंशीय (ॲग्नेटिक) संबंधांमध्ये वडील आणि वडलांचे वडीलच महत्त्वाचे असतात, तर मातृकुलीन परंपरा असलेल्या (युटेराईन) संबंधांमध्ये - किंवा अधिक स्पष्ट सांगायचे झाल्यास

गर्भाशयाचा संबंध किंवा सोदर संबंध असेल त्या समाजव्यवस्थांमध्ये - आईचा भाऊ महत्त्वाचा मानला जातो. त्यामुळे बांव्हनिस्त अशी कल्पना करतो की आजे-मामे घराण्यांमध्ये लग्न करण्याची त्या समाजात प्रथा असल्यामुळे एखाद्या माणसाच्या वडलांचे वडीलच त्याच्या आईच्या आईचा भाऊही असायचे. म्हणजे आईचा मामा हाच तिचा सासराही असायचा. लॅटिनमधली समस्या बांव्हनिस्त अशा पद्धतीने सोडवून दाखवतो.

इकडे संस्कृतमध्ये मामासाठी 'मातुल' हा शब्द वापरला जातो आणि तो 'मातामह' म्हणजे आईचे वडील आणि 'पितामह' म्हणजे वडलांचे वडील या दोहोंपेक्षा अगदीच वेगळा आहे. ग्रीकमध्ये आईच्या भावासाठी 'मेट्रोस' (metros) असा शब्द आहे आणि तो वडलांचा भाऊ या अर्थाच्या 'पेट्रोस' (petros) वरून साधर्म्यसंबंधाने बनविलेला आहे. बांव्हेनिसच्या मते (१९७९ : २१२) संस्कृत 'मातुल' आणि ग्रीक 'मेट्रोस' हे इंडो-युरोपियन पदनामांसाठी अलीकडे बनविण्यात आलेले प्रतिशब्द आहेत. वडलांच्या संदर्भात आईच्या भावाला जेव्हा फारसे महत्त्व उरले नाही तेव्हा मूळ इंडो-युरोपियन पदनामही वापरातून नाहीसे झाले आणि त्या पदनामाच्या बदल्यात संस्कृत 'मातुल' आणि ग्रीक 'मेट्रोस' हे प्रतिशब्द वापरात आले. भारतीय समाजामध्ये आईचा भाऊ हा सगळ्यात आवडता नातेवाईक असतो ही गोष्ट महत्त्वाची आणि रंजकही आहे. संकटाच्या वेळी तोच आपल्या भाचरांच्या मदतीला धावत आलेला दिसतो. कृष्णाने आपली बहीण सुभद्रा हिच्या मुलाला, म्हणजे अभिमन्यूला आपल्या घरी वाढविले ही महाभारतातली गोष्ट याचे उत्तम उदाहरण आहे. यावरून असेही म्हणता येईल की आईचा भाऊ म्हणजे मामा आणि बहिणीचा मुलगा म्हणजे भाचा असे मामाभाच्यांमधील जिव्हाळ्याचे संबंध कमीत कमी महाभारताइतके प्राचीन असले पाहिजेत. या बाबतीत येथे आणखी एका गोष्टीची नोंद करायला पाहिजे आणि ती म्हणजे संस्कृत भाषा बोलणारा समाज आणि इतर भारतीय भाषा बोलणारे समाज हे या संदर्भात वेगवेगळे आहेत. दुसऱ्या शब्दात सांगायचे तर, भारतीय आर्य समाजाने हेतुतः केलेला हा एक आगळाच उपक्रम आहे. पण यावर असा प्रश्न विचारला जाऊ शकेल की या उपक्रमाचा स्रोत कोणता होता? या प्रश्नाचे उत्तर शोधण्यासाठी आपल्याला इंडो-आर्यन कुळात मोडणाऱ्या भाषांमध्ये तसेच द्राविडी आणि मुण्डा या भाषांमध्ये 'आईचा भाऊ' या संकल्पनेसाठी कोणते शब्द आहेत, याचा आधी शोध घ्यायला हवा. या भाषांमध्ये 'आईचा भाऊ' या

संकल्पनेसाठी साधारणतः 'मामा' आणि तत्सम शद्ब वापरला जातो. तेव्हा आपण इंडो-आर्यन, द्राविडी आणि मुण्डा या प्रत्येक गटातील दोन दोन भाषांचे उदाहरण घेऊ :

| **इंडो-आर्यन** | **द्राविडी** | **मुण्डा** |
|---|---|---|
| ओरिया - मामु | तेलुगू - माम | बोंडा - मामु, मामुन |
| हिंदी - मामा | तमीळ - मामा, मामन | खरिया - मामु |

तिबेटो-बर्मन या कुळातील काही भाषा 'मामा' या शद्बापासून बनवलेलीच संज्ञा वापरतात, तर इतर भाषा वेगळीच संज्ञा वापरतात. उदाहरणार्थ, 'बोडो' या भाषेत मामासाठी 'माय' ही संज्ञा वापरली जाते आणि त्याचे कारण तिचा असमी भाषेशी असलेला निकटचा संबंध आहे हे स्पष्ट आहे पण अरूणाचल प्रदेशात बोलल्या जाणाऱ्या 'अक' या भाषेत आईच्या भावासाठी 'अस' ही संज्ञा वापरली जाते.

यातली आणखी एक मौजेची गोष्ट म्हणजे इण्डो-आर्यन कुळ वगळता इतर सर्व भाषांमध्ये 'आईचा भाऊ' हा अर्थ दाखवणारी संज्ञाच 'वडिलांच्या बहिणीचा (म्हणजे आत्याचा) नवरा' हा अर्थदेखील दाखवते. पण द्राविडी भाषांमध्ये मात्र 'आईचा भाऊ' आणि 'वडिलांच्या बहिणीचा नवरा' या अर्थासोबतच तीच संज्ञा 'बायकोचे वडील' हे नातेही दाखवते. तेव्हा 'मामा' या शद्बाच्या संदर्भात या सर्व भाषांमधील शद्बसमूहात एक प्रकारची उतरंड दाखवता येते.

**शद्ब - मामा वा तत्सम**

| **भाषा : द्राविडी** | **मुण्डा, तिबेटो बर्मन** | **इण्डो-आर्यन** |
|---|---|---|
| आईचा भाऊ | आईचा भाऊ | आईचा भाऊ |
| वडलांच्या बहिणीचा नवरा | वडलांच्या बहिणीचा नवरा | - - - - |
| बायकोचे वडील | - - - - | - - - - |

दुसऱ्या शद्बात द्रविड समाज बहिणींची देवाणघेवाण आणि मामा-भाची विवाहाला मान्यता देतो असा याचा अर्थ होतो. मुण्डा आणि तिबेटो बर्मन समाजात फक्त बहिणींची देवाणघेवाण मान्य आहे आणि या बाबतीत तो द्राविडी पद्धतीचाच एक भाग आहे, असे दिसते. पण इण्डो-आर्यन समाजात मात्र या दोन्ही गोष्टींना मान्यता दिसत नाही. (म्हणूनच या भाषांमध्ये मामा, फूफा किंवा आतोबा आणि ससुर / सासरा असे तीन वेगवेगळे शद्ब आढळतात.)

येथे द्रविड समाजातील विवाहासंबंधीच्या एका महत्त्वाच्या वैशिष्ट्याची चर्चा करणे अस्थानीं ठरणार नाही. द्रविड समाजातील नवऱ्या मुलाला एकतर आईच्या भावाच्या मुलीशी म्हणजे मामेबहिणीशी किंवा वडलांच्या बहिणीच्या मुलीशी म्हणजे आतेबहिणीशी लग्न करण्याचा असे दोन पर्याय उपलब्ध असतात; पण या पर्यायांपैकी प्रायः पहिला पर्याय - म्हणजे मामेबहिणीशी लग्न करणे - जास्त करून स्वीकारला जातो. असे का?

आपणा सर्वांना हे ठाऊकच आहे की 'कन्यादान' म्हणजे मुलगी लग्नात देणे, ही गोष्ट भारतीय समाजामध्ये फार मोठे धर्मकृत्य मानले जाते व त्याचे पुण्य केवळ प्रत्यक्ष आईवडलांनाच नव्हे तर त्यांच्या जागी जो कुणी 'कन्यादान' करील त्यालाही मिळते अशी श्रद्धा आहे. त्यात आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे कन्यादान करणाऱ्याने वरपक्षाकडून काहीही घेणे ही गोष्ट धर्मबाह्य आणि रूढीबाह्य मानली जाते. पुष्कळ ठिकाणी तर मुलीकडचे लोक मुलीच्या सासरी पाणीदेखील पीत नाहीत तर उलट मुलीकडचे लोक मुलीच्या सासरी वेळोवेळी भेटवस्तू पाठवत राहतात आणि मुलीच्या सासरच्या लोकांना अतिशय आदराने आणि प्रेमाने वागवतात. ही जरी खास इण्डो-युरोपियन रूढी असली तरी ती इण्डो - आर्यन लोकांनी जशीच्या तशी सांभाळली असून द्रविड लोकांसह संपूर्ण भारतातील उच्चवर्णीयांमध्ये ती खास करून सांभाळली जाते. ट्राउटमन (१९७९ : १७०) म्हणतो त्याप्रमाणे वडलांच्या बहिणीच्या मुलीपेक्षा - म्हणजे आतेबहिणीपेक्षा - आईच्या भावाच्या मुलीला - म्हणजे मामेबहिणीला - अधिक पसंती देण्याचे कारण या रूढीतच आहे. कारण एकदा आपली मुलगी अथवा बहीण लग्न करून दुसऱ्याकडे पाठवली की भेटवस्तू आणि मानसन्मानाचा ओघ फक्त मुलीकडून तिच्या सासरी असाच चालत राहतो. पण आतेबहिणीशी लग्न केले तर हा ओघ उलटा वळवावा लागेल. म्हणजे बहिणीच्या सासरी भेटवस्तू पाठवण्याऐवजी आता तिच्या सासरहून भेटवस्तू घेण्याचा धर्मबाह्य आणि रूढीबाह्य असा अनवस्था प्रसंग ओढवेल! आणि अखेर यातून हितसंबंधांमध्ये संघर्ष निर्माण होण्याचा संभवही येऊ शकेल. पण या उलट जर आईच्या भावाची म्हणजे मामाची मुलगी केली तर असा संघर्ष उद्‌भवणारच नाही, कारण भेटवस्तू आणि मानसन्मान पूर्वी भावाकडून आपल्या बहिणीकडे जायचे ते आता आपल्या मुलीकडे जायला लागतील एवढेच. वडलांच्या बहिणीच्या - म्हणजे आत्याच्या - मुलीशी लग्न करण्यापेक्षा आईच्या भावाच्या - म्हणजे मामाच्या - मुलीशी लग्न

करणे द्राविडी पुरुषांना अधिक का पसंत आहे याचे हे अगदी उघड कारण आहे.

इथे आणखी एका गोष्टीची नोंद घ्यायला पाहिजे आणि ती म्हणजे सर्व द्राविड भाषांमध्ये 'मामा' किंवा तत्सम शद्बच वापरला जातो. सध्याच्या इण्डो-आर्यन भाषादेखील संस्कृतमधल्या 'मातुल' शद्बाऐवजी (किंवा त्यापासून तयार झालेल्या इतर कोणत्याही शद्बाऐवजी) 'मामा' हाच शद्ब वापरतात. तेव्हा आईच्या भावासाठी योजण्यात येणारा 'मामा' हा शद्ब इण्डो-आर्यन भाषांनी द्राविडी भाषांपासून घेतला आहे असे म्हणता येते आणि तसे असल्यास भारतीय उपखंडांमध्ये भाषिक देवाणघेवाणीबरोबरच सांस्कृतिक देवाणघेवाणही अधिक खोल पातळीवर चालत असली पाहिजे असे सूचित होते.

येथे नमूद करण्यासारखी आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे द्रविडी आदिवासींसकट द्रविडी भाषा बोलणारे जवळपास सर्व लोक 'मामा' हा शद्ब एखाद्या वयोवृद्ध आणि आदरणीय वाटणाऱ्या अनोळखी इसमाला उद्देशून वापरतात. याच प्रभावामुळे महाराष्ट्राच्या ग्रामीण भागात-विशेषतः मराठवाड्यात, तसेच गुजराथच्या काही भागात आदरणीय, वयोवृद्ध तसेच अनोळखी इसमालाही 'मामा' म्हटले जाते. खेड्यातील लोक अडचणीच्या प्रसंगी अशा गावमामांकडे मदत मागायला जातात आणि तोही त्यांना मदत करतो. महाराष्ट्रात आदर आणि प्रेमभावनेतून ज्यांच्या नावामागे 'मामा' हे उपपदच लावले गेले अशा शेलारमामा, मामा वरेरकर, मामा काणे वगैरेंसारख्या काही प्रसिद्ध व्यक्तीही आढळतात.

इण्डो-आर्यन लोकांचे वसतिस्थान असलेल्या उत्तर भारतात मात्र मामाच्या ऐवजी 'चाचा' हा शद्ब सर्रास वापरला जातो. उदाहरणार्थ, चाचा नेहरू, गुजराथ आणि महाराष्ट्राच्या शहरी भागातदेखील जेथे 'अंकल' या इंग्रजी शद्बाचा वापर करीत नाहीत तेथे 'मामा' पेक्षा 'काका' या शद्बाचाच जास्त प्रयोग केला जातो. याचे कारण मी ज्याला 'दुसरे आर्यीकरण' म्हणतो ते आहे. यालाच भाषावैज्ञानिक 'नव उत्तर इण्डो-आर्यन किंवा हिंदी भाषेचा प्रभाव' असेही म्हणतात.

भाषावैज्ञानिक नसणारे पण सामाजिक आणि कौटुंबिक असणारे आणखीही एक कारण यामागे सांगता येते आणि ते म्हणजे परपुरुषाला 'काका' म्हणण्यापेक्षा त्याला 'मामा' म्हणून टाकले म्हणजे तो आपोआपच आपल्या बायकोचा भाऊ ठरतो आणि मग त्याच्यापासून तिला कोणताही धोका उरत नाही! चंद्र हा पुराणांतरी आपल्या लंपटपणासाठी प्रसिद्ध आहे. त्याला कदाचित याच कारणासाठी



अनुक्रमणिका

'मामा' बनवून टाकले गेले असेल अशीही एक शक्यता आहे; पण त्यासंबंधी विचार जरा नंतर करू.

तर मुख्य मुद्याकडे वळावयाचे म्हंणजे वयस्क, आदरणीय आणि अनोळखी माणसाला महाराष्ट्राच्या ग्रामीण भागात 'मामा' म्हणतात आणि हे उत्तर हिंदुस्थानातील प्रथेला सोडून आहे. तेव्हा हाही द्रविड संस्कृतीचाच मराठीवरील परिणाम होय असे म्हणता येते.

## ३. भावाबहिणीतील नाते

भाऊ आणि त्याची विवाहित बहीण यांच्यात आर्य आणि द्रविड या दोन समाजांमध्ये असलेल्या नातेसंबंधाची तुलना केली तर त्यातही फरक आढळून येतो. इण्डो-युरोपियनांच्या पावलावर पाऊल टाकून इण्डो-आर्यन लोकदेखील विवाह करून गेलेल्या बहिणीला कुटुंबाबाहेरची मानतात. कारण लग्नानंतर मातृकुळाशी सर्व संबंध तोडून तिला पतीच्या कुळामध्ये स्थापित केले जाते. (तिचे नावदेखील बदलण्यात येते.) पण द्रविड लोकांमध्ये मात्र परिस्थिती वेगळीच असते. तिथे विवाहित बहीण ही आपल्या भावाचे कुळ आणि पतीचे कुळ यांच्यात संबंध जोडणारा दुवा म्हणून कार्य करीत राहते.

मात्र इण्डो-आर्यन असोत की द्रविड, भावाला आपली बहीण आणि तिची मुले यांना सणावारी, लग्नप्रसंगी आणि इतर कार्यप्रसंगी भेटी पाठवाव्याच लागतात. खरे तर भावाभावांमध्ये नेहमी पैतृकसंपत्तीसाठी भांडणे होत असतात असा इतिहास आहे; पण असे असतानासुद्धा भाऊ आपल्या बहिणीला आणि भाचरांना मात्र नियमितपणे भेटी पाठवत राहतो ही आश्चर्याची आणि कुतुहलाचीच बाब ठरते. तेव्हा प्रथम या गोष्टीचा छडा लावण्याचा जरा प्रयत्न करू.

संस्कृत भाषेत 'बहीण' या शद्बासाठी दोन शद्ब आहेत. एक 'स्वसा' आणि दुसरा 'भगिनी', 'स्वसा' हा परंपरेने चालत आलेला आहे, तर 'भगिनी' मात्र या भाषेने मुद्दाम निर्माण केलेला आहे. असे म्हणण्याचे कारण 'स्वसा' या शद्बाशी साधर्म्य दाखवणारे शद्ब इतर भारतीय भाषांमध्ये आढळतात. उदाहरणार्थ, लॅटिनमध्ये 'सोरोर', ग्रीकमध्ये 'हेओर' किंवा 'एओर', जुन्या स्लाव्होनिक भाषेत 'सेस्रा', जुन्या आयरिशमध्ये 'सिऊर' आणि जुन्या उच्च जर्मनमध्ये 'स्वेस्तर' आदी शद्ब आढळतात. पण आश्चर्याची गोष्ट अशी की इण्डो-युरोपियनच्या मध्यकाळात ही संज्ञा पूर्णपणे वापरातून गेली आणि त्या जागी 'भगिनी' ही संज्ञा आली. म्हणूनच नव्या भारतीय भाषांमध्ये 'भगिनी' पासून तयार झालेले शद्बच पहायला मिळतात.

उदाहरणार्थ,

| **भाषा** | **बहिणीसाठी शब्द** |
|---|---|
| मध्य भारतीय भाषा | ससा, भगिनी, बहिणी, भइणी |
| असमी | भाणी |
| बंगाली | बोन |
| गुजराथी | बेन |
| हिंदी | बहन |
| काश्मिरी | बेनी |
| मराठी | बहीण |
| नेपाळी | बहिनी |
| ओरिया | भौणी |
| पंजाबी | पैण |
| सिंधी | भेणी |

आता प्रश्न असा आहे की संस्कृतातल्या या 'भगिनी'चे मूळ कुठे आहे? तसेच आधुनिक भारतीय भाषांमध्ये तो शब्द राखला गेला याचेही कारण काय असावे? विद्वानांचे असे मत आहे की 'स्वेसोर' हा शब्द 'स्वे' म्हणजे 'स्वतःची' आणि 'सोर' म्हणजे 'स्त्री' या घटकांचा मिळून बनलेला आहे. याचा अर्थ ही संज्ञा वर्गीकरणार्थ वापरली जात असून तिचा अर्थ 'स्वतःची स्त्री' किंवा 'स्वतःच्या वंशातील स्त्री' म्हणजेच बहीण किंवा पैतृक परंपरेने असलेली अर्थात 'चुलत घरातील स्त्री' असा आहे. (फ्रायडरीच १९७९:२१२, बांव्हनिस्त १९७९ : १७३-४). तेव्हा भारतीय आर्यांनी बायको, बहीण किंवा चुलती या अर्थाने वापरात असलेल्या 'स्वसा' या संदिग्ध शब्दापेक्षा अधिक निश्चित अर्थ व्यक्त करणारी व निःसंदिग्ध संज्ञा म्हणून 'भगिनी' हा शब्द निवडला.

'भगिनी' या शब्दात भग + इन + निप् असे घटक आहेत. (विल्सन १९७९ : ५२८). 'भग' या शब्दाच्या इतर विविध अर्थांपैकी सौभाग्य, सुख, कल्याण, वैभव हे अर्थ या संज्ञेशी संबद्ध आहेत (मोनियर विल्यम्स १९७६ : ७४३). दुसऱ्या शब्दात 'भगिनी' हा शब्द सौभाग्य, कल्याण, वैभव आदींचे प्रतीक होता. इथे हे मुद्दाम स्पष्ट केले पाहिजे की प्राचीन भारतीय समाजामध्ये [illegible] आणि बहीण या दोघांचाही पैतृक संपत्तीवर समान हक्क असे (कर्वे १९६५ : ३५५). स्मृतिकार मनुदेखील म्हणतो की, मुलगा आणि मुलगी










असा कोणताही भेदाभेद न करता वारशाचा हक्क दोघांनाही आहे (सरूप १९६७ : ४०). त्यामुळे वैभव आणि सौभाग्य या संकल्पना 'भगिनी' या शब्दाशी संबद्ध होण्याचे हे एक सबळ कारण दिसते. त्या काळात मुलीला नुसता वारशाचाच हक्क असे एवढेच नव्हे, तर बहिणीचे निधन झाल्यास तिच्या हक्काची असलेली पैतृक संपत्ती तिच्या मुलाकडे वारसाहक्काने जात असे (कर्वे १९६५ : ३५५). तेव्हा ज्या संपत्तीवर आपल्या विवाहित बहिणीचा आणि तिच्या मुलांचा हक्क आहे त्या संपत्तीचा निर्वेध उपभोग आपल्याला घेता यावा म्हणून भावाने बहिणीकडे वारंवार भेटवस्तू पाठवून तिला खूश ठेवण्याचा प्रयत्न करावा यात काही नवल नाही. याच कारणासाठी मामाभाच्यांचे संबंध फार प्राचीन काळापासून अतिशय सौहार्दाचे असल्याचे आपल्याला आढळून येते. उदाहरणार्थ, महाभारतामध्ये कौरवांना सल्ला देणारा शकुनी हा त्यांचा मामाच आहे. या उलट मामा नसल्यामुळे मामाचा मुलगा कृष्ण हा स्वतः पुढाकार घेऊन पांडवांचा सल्लागार बनलेला दिसतो. एवढेच नव्हे तर पांडव वनवासात असताना कृष्णाने आपली बहीण सुभद्रा आणि तिचा मुलगा अभिमन्यू यांची स्वतः देखभालही केलेली दिसते. दुसरे उदाहरण म्हणजे अयोध्येचा घोषित राजपुत्र आणि कौसल्येचा सुत राम. अयोध्येतून निष्कासित झाल्यानंतर तो मध्यभारतातच आला याचे कारणच मुळी तिकडे त्याच्या मामाचे राज्य होते हेच असले पाहिजे, असे माझे ठाम मत आहे. वनवासात असताना तिकडे त्याला तेथील प्रजाजनांचा जो अभूतपूर्व पाठिंबा आणि मदत मिळाली त्याचे हे एक महत्त्वाचे कारण असले पाहिजे.

मामाभाच्यांमधील हे विशेष सौहार्दपूर्ण संबंध केवळ भारतीय समाजापुरतेच मर्यादित नाहीत. जगाच्या पाठीवरील इतर अनेक समाजांमध्येही मामा-भाचरांचे अतिशय जवळिकीचे आणि सौहार्दपूर्ण संबंध दिसून येतात. मामाभाच्यांचे हे नाते खरे तर इतके घट्ट आहे, की दक्षिण आफ्रिका आणि पोलिनेशिया येथील लोकांचा अभ्यास केल्यानंतर रेडक्लिफ-ब्राऊन यांनी मामासाठी 'पुं-माता' (male mother) असा शब्दप्रयोग केलेला आढळतो (१९५२:१९).

तेव्हा आता या साऱ्या पृष्ठभूमीवर वाघ, चंद्र, उंदीर आणि पोलीस यांना 'मामा' असे का संबोधले जाते याचा विचार करावयाचा आहे.

## ४. इतर मामा

प्रथम आपण वाघाचा विचार करू. वाघाला खालील कारणांसाठी 'मामा' असे म्हटले जाते :

जुन्या काळी वाघ हाच सर्वांत हिंस्र आणि भयानक प्राणी समजला जाई. त्यामुळेच 'नरभक्षक' ही संज्ञा फक्त वाघालाच लावली जाते, इतर प्राण्यांना नाही. पूर्व भारतातल्या जंगलात एकेकाळी वाघ विपुल प्रमाणात होते आणि सुंदरबनचे वाघ तर आजही प्रसिद्ध आहेत. पूर्व भारतातल्या लोकांच्या मनात वाघाची भीती इतकी खोलवर दडलेली आहे; की ओरिसामध्ये आषाढ वद्य पंचमी हा दिवस आजही रक्षापंचमी म्हणूनच साजरा केला जातो. या दिवशी लोक शंकर, कार्तिकेय आणि गणेश या देवतांची पूजा करतात, त्यांनी आपले रक्षण करावे अशी प्रार्थना असलेला एक मंत्र ताडपत्रावर लिहितात, तो घराच्या प्रवेशद्वाराशी, उंबरठ्याबाहेर ठेवतात आणि देवतांसाठी तयार केलेल्या नैवेद्यातील काही भाग वाघासाठी म्हणून दाराच्या बाहेर फेकून दार बंद करून घेतात. वाघाने आपल्याला खाऊ नये म्हणूनच त्याच्यासाठी अन्न ठेवले जाते हे उघडच आहे आणि तरीही वाघ आलाच तर त्याच्यापासून रक्षण करावे म्हणून हे लोक शंकराची आणि त्याच्या पुत्रांची प्रार्थना करतात हेही स्पष्टच आहे. (या माहितीसाठी लेखक श्री. के.के. मिश्रा यांचा आभारी आहे). पूर्व भारतातल्या अनेक भाषांमध्ये वाघासारख्या मुंग्या, वाघासारखे भुंगे, वाघासारखे किडे आणि वाघासारख्या मिश्या असे वाक्प्रयोग रोजच्या व्यवहारात सर्रास केले जातात आणि अशा वाक्प्रयोगांमध्ये इतर कोणत्याही जनावराला स्थान नाही. तेव्हा वरील पार्श्वभूमीवर असे अनुमान केले की 'वाघाला मामा म्हटले तर तो आपल्याला इजा पोचवणार नाही अशी लोकांची श्रद्धा होती', तर ते अगदी तर्कसंगत ठरेल.

या अनुमानाला बळकटी देणारा पुरावा जातककथांमधून मिळतो. जातककथा या सर्वप्रथम पूर्व भारतात लिहिल्या गेल्या असे मानले जाते ही गोष्ट येथे लक्षात ठेवावी.

येथे प्रस्तुत असणारी गोष्ट 'बक' जातकातील आहे - खेकडा आणि बगळा यांची. खेकड्याला जेव्हा कळते की बगळा त्याला ठार करणार आहे तेव्हा त्याला आपली दया यावी म्हणून तो बगळ्याला 'मामा' असे संबोधतो. दुसऱ्या 'गामणीचण्ड' जातकातदेखील एक तबेलावाला, एक गावप्रमुख आणि एक वेश्या गामणीचण्डाने आपल्यावर मर्जी दाखवावी म्हणून त्याला 'मामा' असे संबोधतात. 'दीपी' जातकातसुद्धा वाघाशी गाठ पडली असता कोकरू त्याला आपल्या आईचा नमस्कार [illegible] आणि अशा प्रकारे त्याला आपला मामा ठरवून त्याच्याशी नातेसंबंध जोडायचा प्रयत्न करते. तेव्हा सांगायचा मुद्दा असा की ज्याच्या ठिकाणी काही

उपद्रव मूल्य असेल अशाला तो आपला मामा आहे असे म्हटल्याने त्याच्या मनात जराशी दया निर्माण होईल आणि तो आपल्याला इजा करणार नाही असेच या सर्व ठिकाणी मानले गेल्याचे दिसून येते. वाघालाही मामा म्हणण्यामागे हाच उद्देश दिसतो.

चंद्राला 'मामा' संबोधण्यामागेही असेच कारण दिसते. पण त्याकडे वळण्यापूर्वी चंद्राच्या जन्मकथेकडे लक्ष देणे जरा आवश्यक ठरेल. भारतीय पुराणांनुसार धनाची देवता असलेल्या लक्ष्मीबरोबरच चंद्र हादेखील समुद्रमंथनातून बाहेर पडलेला आहे. हिंदू लोक लक्ष्मीची पूजा मातृदेवता म्हणून करतात. चंद्र आणि लक्ष्मी दोघेही समुद्रमंथनातून निर्माण झाल्यामुळे बहीणभाऊ आणि म्हणूनच चंद्र हा आपोआपच (म्हणजे मातृदेवतेचा भाऊ म्हणून) मामा ठरतो असा युक्तिवाद करता येऊ शकेल, पण तो फारसा पटणारा नाही. कारण या न्यायाने समुद्रमंथनातून बाहेर पडलेले तारे, उच्चैःश्रवस् अश्व, कौस्तुभरत्न, धन्वंतरी आदी साऱ्यांनाच मामा म्हटले जायला पाहिजे; पण तसे म्हटले जात नाही.

दुसरा युक्तिवाद असा केला जाऊ शकेल की चंद्राला जीवनदायी म्हटले जाते, कारण तो रात्री आपल्या प्रकाशाने वनस्पती आणि प्राणिसृष्टीला नवचैतन्य देत असतो, म्हणून त्याला मामा म्हटले जात असेल; पण हाही युक्तिवाद टिकणारा नाही. कारण सूर्य हाही जीवनदायी आहे; पण त्याला मात्र मामा म्हटले जात नाही. त्यामुळे चंद्राला मामा का म्हटले जाते या प्रश्नाचे उत्तर आपणाला आणखी इतरत्र शोधले पाहिजे.

कृष्णपक्षातील दिवसेंदिवस क्षीण होत जाणारा चंद्र हा अनेक लोकांना अशुभ आणि अभद्र वाटतो हे जगजाहीर आहे. याच कारणामुळे विविध भाषांमध्ये चंद्रासाठी वापरले जाणारे शब्ददेखील वेळोवेळी बदलले गेलेले दिसतात. उदाहरणार्थ, प्राचीन ग्रीकमध्ये चंद्रासाठी 'मेने' हा शब्द वापरला जाई. प्रोटो-इण्डो-युरोपियनमधून घेतलेला हा शब्द ग्रीक भाषेने लवकरच टाकून दिला आणि त्या जागी 'सेलेने' हा शब्द वापरायला सुरुवात केली. 'सेलेने' हा शब्द 'सेलास' या शब्दावरून आलेला असून त्याचा अर्थ 'प्रकाशमान' असा आहे. मौजेची गोष्ट अशी की हा शब्ददेखील काळाच्या ओघात बाद केला गेला आणि त्याच्या जागी 'चमकणारी वस्तू' या अर्थाचा 'फेंगेरी' हा शब्द स्थिरावला. लॅटिन या आणखी एका इण्डो-युरोपियन भाषेने 'मेने' हा प्रोटो-इण्डो-युरोपियन शब्द फक्त महिना या अर्थी वापरल्या जाणाऱ्या 'मेन्सिस' या शब्दातच केवळ जतन केला आहे. चंद्रासाठी ती भाषा 'लूना' (म्हणजे चकाकणारी वस्तू) हा शब्द वापरते. संस्कृत या आणखी

एका संलग्न इण्डो-युरोपियन भाषेने तर हा आद्य शद्ब अगदीच वाळीत टाकलेला दिसतो आहे. संस्कृतमध्ये सर्वसामान्यपणे वापरला जाणारा शद्ब आहे - 'चंद्र' आणि त्याचाही शद्बशः अर्थ आहे - चमकणारा. चंद्र म्हणजे चमकणे या धातूपासून तो साधलेला असून त्याच्याशी संलग्न असे 'कँडिओ', 'कँडिडस', 'इन्सेंडो' आदी लॅटिन शद्ब आणि 'कँडिड', 'सिन्डर', 'कँडल' वग़ैरे इंग्रजी शद्ब दिसतात. तेव्हा इंग्रजीतला 'मून' हा शद्ब सोडला तर 'मेने' हा आद्य प्रोटो-इण्डो-युरोपियन शद्ब प्रायः सर्व भाषांनी टाकून दिलेला आहे असे लक्षात येते. संस्कृतातला चंद्र हा शद्बदेखील हिंदी, बंगाली, गुजराती, मराठीसारख्या काही नवभारतीय भाषांनी स्वीकारलेला दिसत असला तरी उडिया, असमी आणि नेपाळी यांसारख्या पूर्वप्रांतातल्या भाषांमध्ये मात्र चंद्र हा शद्ब दिसत नाही. त्या भाषा अनुक्रमे 'जन्ह', 'जोन्बाई' किंवा 'जून' असे शद्ब वापरताना दिसतात. हे शद्ब 'चंद्र' पासून व्युत्पादिता येत नाहीत. त्यांची व्युत्पत्ती 'ज्योत्स्ना' (म्हणजे चंद्रप्रकाश) या शद्बात आहे. या भाषांनी हे पर्यायी शद्ब स्वीकारले याचे कारण जसा 'मेने' या आद्य प्रोटो-इण्डो-युरोपियन शद्बाला अभद्रपणाचा शिक्का बसला होता. तसाच काहीसा प्रकार संस्कृतमधल्या 'चंद्र' या शद्बाबाबतही अंशतः झालेला दिसतो.

उदाहरणार्थ, विनायकी चतुर्थीच्या दिवशी कुणीही चंद्राकडे पाहू नये अशी हिंदू परंपरेत रीत आहे. एवढेच नव्हे तर, अमावस्येनंतर येणाऱ्या प्रतिपदेला 'चंद्रदर्शना'चा एक खास विधीदेखील हिंदू परंपरेत पाळला जातो. याशिवाय एलियाड (१९८७ : ९०) म्हणतो त्याप्रमाणे, 'जगात प्रायः सर्वत्र असे मानण्यात येते की पूर्णचंद्राचा प्रकाश माणसाचे लांडग्यात रूपांतर करतो, तसेच कुणी जर पौर्णिमेच्या चांदण्यात झोपला तर ते चांदणे त्याला वेडा बनवते. युरोप आणि अमेरिकेत तर हा सार्वत्रिक समज आहे की पौर्णिमेच्या रात्रीच जास्त गुन्हे घडतात, जास्त मुले जन्माला येतात आणि इतर कोणत्याही वेळेपेक्षा याच रात्री जास्त मनोरुग्ण वेड्यांच्या इस्पितळात दाखल होतात' तेव्हा या पार्श्वभूमीवर मी असे प्रतिपादन करू इच्छितो की चंद्राविषयी वाटणाऱ्या या भीतीपायीच हिंदू परंपरेत चंद्राला मामा असे म्हणण्यात येऊ लागले असले पाहिजे.

उंदराला 'मामा' असे म्हटले जाते ते जास्त करून महाराष्ट्रात आणि गुजरातमध्ये. मराठीत 'उंदीरमामा' आणि गुजरातीत 'उंदरमामा' असे शद्ब वापरले जातात. पूर्वभारतातील लोक ज्या कारणामुळे वाघाला 'मामा' म्हणतात त्याच कारणामुळे येथे उंदराला 'मामा' म्हटले जाते असे म्हणता येते. आपल्याला



अनुक्रमणिका

ठाऊकच असेल की एक उंदीर एका दिवसात सहा माणसांना पुरेल इतक्या प्रचंड धान्याची नासाडी करतो. त्यामुळे अन्नधान्याच्या तुटवड्याचे एक महत्त्वाचे कारण उंदीर ठरतो. तेव्हा माणसाने उंदराशी मामाचे नाते यासाठी जोडले असले पाहिजे की निदान या नात्यामुळे तरी उंदीर अन्नधान्याची नासाडी करणार नाहीत अशी आशा त्याला वाटत असली पाहिजे. येथे हेही नमूद करणे अस्थानी ठरणार नाही की विघ्नहर्त्या गणेशाचे वाहन म्हणून आपल्या परंपरेने उंदराची प्रतिष्ठापना केलेली असून भारताच्या पश्चिम भागात उंदराची पूजा करण्याची प्रथा आहे आणि राजस्थानात सवाई माधोपूर येथे तर उंदराचे एक मंदिरच आहे.

पोलिसाला 'मामा' म्हणण्यात येऊ लागले तो काळ साधारणपणे एकोणिसाव्या शतकाचा शेवट किंवा विसाव्या शतकाचा प्रारंभ आहे. मुळात 'पोलीस' हा शब्दच भारतात ब्रिटिशांच्या राजवटीत आला. भारतातल्या सध्याच्या लोकशाही प्रशासन पद्धतीतसुद्धा पोलीस हा एक प्रचंड सत्ता हाती असलेला आणि सर्वसामान्य माणसाला कोणत्याही क्षणी अत्यंत उपद्रवकारक ठरू शकणारा घटक आहे. स्वातंत्र्यपूर्व काळी तर सर्वसामान्य लोक पोलीस या यंत्रणेला प्रचंडच घाबरून राहायचे. कारण पोलीस कुणालाही आणि केव्हाही गजाआड करू शकायचे आणि तिथे एखाद्याचा अनन्वित छळही करू शकायचे. स्वातंत्र्याची पाच दशके उलटून गेलेली असली तरी परिस्थितीमध्ये आजही फारसा फरक पडलेला नाही. माणूस कितीही शिकलेला, श्रीमंत असो, अगदी नाईलाजच झाल्याखेरीज तो सहसा आपण होऊन पोलीसस्टेशनची पायरी चढणार नाही. सामान्य माणसाच्या मनात पोलीसाबद्दलची भीती एखाद्या वाघाइतकीच आहे आणि तो एखाद्या उंदराइतकाच त्याला उपद्रवकारक वाटतो. तेव्हा त्याच्याविषयीची भीती आणि त्याच्या दंडुक्यात असलेली सत्ता व त्यातून उद्‌भवणारा उपद्रव यांच्यातून सुटका करून घेता आली तर पहावी म्हणूनच लोक त्याला आईचा भाऊ म्हणजेच 'मामा' असे संबोधत असले पाहिजेत आणि अशा रीतीने त्याच्यापासून आपल्याला सुरक्षित राखण्याचा प्रयत्न करीत असले पाहिजेत असे म्हणता येते.

पण अलीकडे मात्र परिस्थिती खूपच बदललेली दिसेल. पोलीसयंत्रणा पूर्णपणे भ्रष्ट झाल्यानंतर आणि पोलिसांनी आपल्या दंडुकेशाहीचा मन मानेल तसा वापर सुरू केल्यानंतर त्यांच्याविषयीची भीती आणि त्यातून आलेला आदर लोकांमधून आता साफ कमी झालेला असून लोक हळूहळू त्यांची टर उडवायला लागले आहेत. 'अतिपरिचयादवज्ञा' म्हणतात त्याप्रमाणे आता 'मामा' हा शब्द एखाद्याविषयी

तिरस्कार आणि राग दाखवणे या अगदीच विरुद्ध कामांसाठी वापरात यायला लागलेला दिसतो आहे. उदाहरणार्थ, ओरिया भाषेत 'पोलीसमामू' हा शब्द पोलिसांविषयीचा तिरस्कार दाखवण्यासाठीच वापरण्यात येतो. मराठीतसुद्धा 'त्याचा मामा बनला' हा वाक्प्रचार एखाद्याची फजिती उडाली हेच दाखवतो. गुजराथीतही मामा हा शब्द अशाच उपहासगर्भ अर्थाने वापरला जातो. तेव्हा 'मामा' या शब्दाचे हे सांस्कृतिक अध:पतन आहे असे आपण म्हणू शकतो.

**५. कंसमामा : एक स्पष्टीकरण**

भारतीय परंपरेत कृष्णाचा मामा कंस हा मामा या नात्यावरील एक महत्त्वाचे रूपक आहे. वर मी म्हटले आहे की मामा-भाचे संबंध अतिशय निकटचे आणि जिव्हाळ्याचे असतात आणि आईचा भाऊ हा जणू काही पुरुष-आईच असतो, असे मानववंशशास्त्रज्ञ मानतात; पण कंस मात्र याला अपवाद दिसतो. मामा असून तो कृष्णाचा हाडवैरी होता आणि त्याने कृष्णाला ठार मारण्याचे सर्वतोपरी प्रयत्न केले असे दिसून येते. तेव्हा या निबंधात मांडलेला सिद्धान्त जर सिद्ध करावयाचा असेल तर या कंसमामाच्या घटनेचे नीट स्पष्टीकरण केले पाहिजे.

कंस आपणाला भेटतो तो महाभारत, हरिवंश आणि श्रीमद्‌भागवत आदी ग्रंथांमधून. पण मौजेची गोष्ट अशी की या प्रत्येक ग्रंथातून दिसणारा कंस थोडाथोडा वेगळाच आहे आणि या वेगळेपणातच तो कृष्णाच्या बाबतीत इतका क्रूर का होता याचे स्पष्टीकरण मिळत जाते.

श्रीमद्‌भागवतानुसार कंस हा कृष्णाच्या आईचा - देवकीचा - भाऊ होता. पण महाभारतात मात्र उग्रसेन आणि देवक हे दोघे भाऊ होते व कंस हा उग्रसेनाचा मुलगा तर देवकी ही देवकाची मुलगी होती असे वर्णन येते. म्हणजे महाभारतानुसार कंस हा देवकीचा सख्खा भाऊ नसून चुलत भाऊ आहे. शिवाय महाभारतातच असेही वर्णन आढळते की, कंस हा उग्रसेनाचा स्वत:चा मुलगा नाही, तर उग्रसेनाच्या पत्नीला - पवनरेखेला - द्रुमिल नावाच्या एका राक्षसाने केलेल्या जबरदस्तीतून झालेला मुलगा आहे. हरिवंशातही कंस हा उग्रसेनाचा कायदेशीर मुलगा नव्हता असेच सांगितलेले आहे. तेव्हा या बाबतीत दोन गोष्टींची नोंद आपण घ्यावयास हवी. एक म्हणजे कंस हा देवकीचा सख्खा भाऊ नव्हता, नंतरच्या काळात कधीतरी तो देवकीचा भाऊ आहे असे दाखविले गेले. दुसरी गोष्ट म्हणजे, कंस हा काही सामान्य माणूस नव्हता, तर तो वास्तविक एक राक्षसपुत्र होता. तो जरासंध या राक्षसाचा जावई होता ही गोष्टही त्याच्या



अनुक्रमणिका

राक्षसवंशत्वावरच बोट ठेवणारी आहे. त्यामुळे अशा व्यक्तीकडून सामान्य माणसासारख्या वर्तनाची अपेक्षा करणे जरा जास्तीच होईल. अर्थात या पार्श्वभूमीवर कंसाचे कृष्णाशी झालेले वर्तन सर्वसाधारण मामा-भाच्यांमधील सौहार्दपूर्ण पातळीवर असण्यापेक्षा, कंसाने कृष्णाला ठार मारण्याचा प्रयत्न करावा हेच अधिक सुसंगत ठरते. भाऊबंदकीचे वैर इथे प्रधान ठरते.

कंस आणि कृष्ण यांचे संबंध अत्यंत तणावपूर्ण असण्याचे आणखी एक कारण म्हणजे वसुदेव हा कृष्णाचा पिता उग्रसेनाचा प्रधानमंत्री होता. कंसाने जेव्हा आपल्या बापाविरुद्ध बंड पुकारले तेव्हा वसुदेव कंसाविरुद्ध उग्रसेनच्या बाजूने उभा राहिला होता व त्याबद्दल त्याने कंसाचा रोष स्वतःवर ओढवून घेतला असे दिसते. तेव्हा वसुदेवाच्या मुलाला म्हणजे कृष्णाला कंसाने पाण्यात पहावे हे ओघानेच आले.

अशा रीतीने कंस हा कृष्णाचा मामा म्हणवला जात असूनही कृष्णाच्या विरोधात का या प्रश्नाचे समाधान करता येते.

**६. उपसंहार**

येथवर केलेल्या चर्चेतून खालील निष्कर्ष काढता येतील :

१. इण्डो-युरोपियन वंशांमध्ये 'आईचा भाऊ' हे नाते फारसे महत्त्वाचे नव्हते. पण इण्डो-आर्यन कुळांमध्ये मात्र ते महत्त्वाचे बनले. हे महत्त्व ही अनार्यांकडून किंवा अधिक स्पष्ट म्हणजे द्रविडांकडून इण्डो-आर्यनांना मिळालेली सांस्कृतिक देण आहे. याला पुरावा म्हणून 'आईचा भाऊ' या नात्यासाठी त्यांनी आपल्या परंपरेत चालत आलेली 'मातुल' ही संज्ञा टाकून देणे आणि द्रविडांची 'मामा' ही संज्ञा स्वीकारणे ही घटना दाखविता येते.

२. भारतीय समाजांमध्ये मामा (म्हणजे आईचा भाऊ) आणि भाचे (म्हणजे बहिणीची मुले) यांच्यातील नाते अत्यंत घनिष्ठ आहे.

३. जातककथांवरून असे दिसते की, एखाद्या माणसाकडून काही उपद्रव वा धोका होण्याचा संभव दिसला, तर त्याला 'आईचा भाऊ' बनवून टाकून त्याच्या मनात कणव निर्माण करण्याचा प्रयत्न केला जाई. या प्रथेमुळेच प्राण्यांमधला सर्वांत घातक असा वाघ, मनुष्यमात्रावर वाईट परिणाम करणारा चंद्र, मोठ्या कष्टाने उगवलेल्या अन्नधान्याची भयंकर नासाडी करणारा उंदीर आणि समाजात फार मोठे उपद्रव मूल्य असलेला पोलीस





अनुक्रमणिका

या सर्वांना भारतीय समाजात प्रायः 'मामा' म्हणून संबोधले जाते.

४. भारतीय परंपरेत असलेल्या मामांच्या पंक्तीत कंसाला बसविता येत नाही आणि त्याने आपला तथाकथित भाचा असलेल्या कृष्णाशी केलेल्या क्रूर वर्तनामागे इतर वैध कारणे आहेत.

**संदर्भ :**


१. *चित्राव सिद्धेश्वरशास्त्री, १९३२, भारतवर्षीय प्राचीन चरित्रकोश, पुणे*

२. *नरवणे विश्वनाथ दिनकर, १९९३, भारतीय व्यवहारकोश, पुणे : मेहता पब्लिशिंग हाऊस (तृतीय आवृत्ती)*

3. *Banergee, G.C. 1982. Introduction to the Khariya Language. New Delhi : Bahri Publications.*

4. *Benveniste, E. 1979. Indo-European Languages and Society Landon : Faber and Faber*

5. *Bhat, D.N.S. 1968. Boro Vocabulary, Pune : Deccan College.*

6. *Bhattacharya, S. 1968. A Bodo Dictionary, Pune : Deccan College.*

7. *Burrow, T. and M.B. Emaneau. 1984. A Dravidian Etymological Dictionary. Oxford : Clarendon Press (2nd edition)*

8. *Cowell, E.B. 1957, The Jataka or Stories of the Buddha's Former Births (Vols. I-VI). Landon. Pali Text Society (reprint).*

9. *Das S.T. 1987. Life Style : Indian Tribes (Locational Practice), Delhi : Gian Publishing Company.*

10. *Eliade, M. (ed.). 1987. The Encyclopedia of Religion, Vol. 10. New York : MAcmillan Publishing Company.*

11. *Friedrich, P. 1979. Language, Society and Imagination. Stanford : Stanford University Press.*

12. *Ghurye, G.S. 1962. Family and Kin in Indo-european Culture. Bombay : Popular Book Depot (2nd edition).*

13. *Karve, I. 1965. Kinship Organisation in India. Bombay : Asia Publishing House (2nd edition)*

14. *Lockwood W.R. 1969. Indo-European Philology Landon Hutchinson University Library.*

15. *Monier-Willams, M. 1976. Sanskarit-English Dictionary, New Delhi : Munshiram Manoharilal. (reprint).*

16. *Pischel, R. 1965. Comparative Grammer of the Prakrit*

*Languages. (translation by S. Jha), Delhi Motilal Banarasidas (2nd edition)*
17. *Radcliff-Brown, A.R. 1952. Structure and Function in Primitive Society. Landon and Henley : Routledge & Kegan Paul.*
18. *Raghavan, V. The Indian Heritage, Bangakore : The Indian Institute of Culture.*
19. *Rhys Davids, T.W. 1975. Pali-English Dictionary. New Delhi : Oriental Books, Reprint Corporation (reprint).*
20. *Sarup, L. (ed.). 1967. The Nighantu and The Nirukta. Delhi : Motilal Banarsidas.*
21. *Trautman, T.R. 1979. The Study of Dravidian Kinship. In : Aryan and Non-Aryan in India. ed. by M. Deshpande and P.E. Hook. Ann Arbor : University of Michigan.*
22. *Warder. A.K. 1963. Introduction to Pali. London : Pali Text Society.*
23. *Wilson, H.N. 1979. Sanskrit-English Dictionary. Delhi : Nag Publishers.*

■

**मूळ इंग्रजी निबंध** : The Other Maternal Uncles In Indian Languages,
**संदर्भ** : 4th Biennial International Conference of Comparitive Literature of India Comparitive Literature of India 29-31 March 1999, Hydcrabad)
**मूळ इंग्रजीवरून भावानुवाद : पद्माकर दादेगावकर**
**लेखक आणि अनुवादक यांचा पत्ता : उपयोजित भाषाविज्ञान आणि भाषांतरविद्या केंद्र, हैद्राबाद विद्यापीट, हैद्राबाद ५०० १४६**

# लोकमान्य टिळक यांचा भाषाविचार

य. शं. कानिटकर

*['लोकमान्य टिळक यांचा भाषाविचार', संपादक : य. शं. कानिटकर, प्रकाशक : लो. टिळक स्मारक ट्रस्ट, पुणे. प्रथम आवृत्ती १ ऑगस्ट २०००, पृष्ठसंख्या १२०, मूल्य १०० रुपये. या पुस्तकाच्या संपादकांची मर्मग्राही प्रस्तावना प्रसिद्ध करत आहोत.]*

प्रस्तुत संग्रहात लोकमान्य टिळकांचे भाषाविषयक लेखन संकलित केले आहे. टिळक साहित्याचे एकूण आठ खंड, समग्र टिळक या नावाने प्रसिद्ध झाले आहेत. हे लेख अनुक्रमे खंड ३,४,५,६,७, आणि ८ या खंडांतून घेतले आहेत. लो. टिळक समग्र साहित्याच्या खंड ८ चे संपादन करताना, टिळकांचे समग्र साहित्य नजरेखालून घालण्याचा सुयोग आला तेव्हा लोकमान्यांनी अक्षरशः अनंत विषयांवर लेखन केले असल्याचे लक्षात आले. भाषाविषयक लेखनही त्यांनी काही निमित्ताने केले असून भाषाविषयक समस्यांवर वेळोवेळी भाषणेही दिली आहेत. लोकमान्य कुठल्याही विषयाचे मूलग्राही विवेचन करतात. तसे ते त्यांनी भाषा व भाषेच्या सर्व अंगोपांगांचे केले आहे. मराठीचा भाषिक अभ्यास व संशोधन करणारांना हे लेख निश्चितच उपयुक्त ठरतील. हे सर्व लेखन सन १८९१ ते १९०६ या कालावधीत म्हणते १०० वर्षांपूर्वी झालेले आहे. आजही ते तितकेच चिंतनीय आहे, याची वाचकांना खात्री पटल्यावाचून राहणार नाही.

भाषा परस्पर संपर्कातून वाढीस लागतात. जेत्यांच्या भाषेचा परिणामही जित राष्ट्राच्या भाषेवर होत असतो व तो उपकारकही ठरू शकतो. या संदर्भात लोकमान्यांनी इंग्रजी भाषेच्या विकासाचा आराखडा घोतला आहे व डेन्स, रोमन, आणि नंतर फ्रेंच या जेत्यांच्या भाषांच्या संपर्काने इंग्रजी भाषा कसकशी विकसित झाली, हे दाखवून दिले आहे.

इंग्रजी भाषेच्या प्रस्तुत स्वरूपाचे मूळ पाहू गेले असता आपणास नॉर्मन



अनुक्रमणिका

राजाच्या कारकीर्दीशी आरंभ करावा लागतो. या पूर्वी म्हणजे पहिल्या विलियम राजाने इंग्लंडवर स्वारी करून आणि साक्सन लोकांचा पराजय करून तेथे नॉर्मन लोकांचे राज्य स्थापन करण्यापूर्वी इंग्लंडात देशी भाषा उर्जित दशेस आली नसून दर तालुक्यास भाषेचा काही निरनिराळाच प्रकार होत असे. पुढे हळूहळू रोमन व डेन्स यांच्या सहवासाने इंग्रजी भाषेत बराच फरक पडला होता. नंतर फ्रेंच तऱ्हा भाषेमध्ये शिरू लागली व त्याच तऱ्हेस नॉर्मन राजाच्या कारकीर्दीत उत्तेजन मिळत गेले. या राजाच्या कारकीर्दीतील भाषेची स्थिती पाहिली म्हणजे आपल्याकडील हल्लीच्या स्थितीचे स्मरण होते. कोर्टातील, ऑफिसातील, दरबारातील, लष्करातील सर्व व्यवहार राजभाषेत म्हणजे नॉर्मन लोकांच्या भाषेत होत असत. ज्यास राजभाषा येईल तो शहाणा, त्याची योग्यता अधिक व त्यासच काही किफायत व्हावयाची अशी स्थिती होऊन गेली होती. इंग्रजी भाषा गोरगरिबांत मात्र प्रचारात असे व तिला कोणत्याही प्रकारचे क्वचितच उत्तेजन मिळे. अशा स्थितीत मूळ इंग्रजी भाषेची वाढ होऊन ती उदयास येईल, असे त्या काळी काही देशाभिमानी लोकांखेरीज कोणासही वाटत नव्हते; परंतु सुदैवाने नॉर्मन राजाचा फ्रान्स देशातील संबंध तुटून त्यास इंग्लंडात आपले घरदार करून तो मायदेश विसरणे भाग पडले. ही गोष्ट जॉन राजाच्या कारकीर्दीत घडून आली व तेव्हापासून अर्वाचीन इंग्रज भाषेस प्रारंभ झाला असे म्हटले पाहिजे. नॉर्मन लोक विजयी, अधिकारसंपन्न व मोठ्या हुद्दयांवर असल्यामुळे त्यांचा मूळच्या इंग्रज लोकांत जरी बेमालूम अंतर्भाव झाला तरी इंग्रजी भाषेच्या सरणीवर नॉर्मन लोकांच्या भाषेची बरीच छाप राहिली व तिला त्यामुळे नवीन जोम येऊन तो तिच्या अभिवृध्दीस बराच कारणीभूत झाला. अशा स्थितीत तिला लॅटिन व ग्रीक भाषांची पुढे मदत मिळाली व इंग्रज राष्ट्र स्वतंत्र लोक आपापले विचार याच भाषेतून प्रसिद्ध करू लागले. धर्मक्रांती व छापण्याची कला यांनी तर अखेरीस अखेरीस भाषावृद्धीस फारच साह्य केले. - व्यापारवृद्धीमुळे निरनिराळ्या लोकांशी निकट संबंध आला. निरनिराळ्या भाषांशी परिचय झाला व नाना तऱ्हेचे विचार व कल्पना लोकांस सुचून त्या व्यक्त करण्याची साधनेही जास्त जास्त वाढू लागली. इंग्रजी भाषेस हल्ली जे स्वरूप आले आहे ते या सर्व संस्कारांचे व कारणांचे फल होय.

भारतातील भाषांवर इंग्रजीच्या संपर्काने, प्रत्यक्ष भाषिक देवाणघेवाणीच्या स्वरूपाचा परिणाम होणार नसला तरी इंग्रजीतील विपुल ज्ञानभांडार भाषांतराच्या माध्यमातून मराठीत आणण्याचा प्रयत्न झाल्यास भाषेला एक नवी मोडणी प्राप्त

होईल व नव्या विषयांसाठी लागणारी शब्दसामग्रीही सिद्ध होईल. इंग्रजीच्या संपर्काचा असा अप्रत्यक्ष परिणाम मराठीच्या विकासाच्या दृष्टीने लाभदायक होईल व यासाठी अन्य भाषेतील सरणीची व शब्दांचीही मदत घ्यावी व असे करणे गैर आहे असे समजू नये, असेही ते ठामपणे म्हणतात.

राष्ट्राचा अभ्युदय व भाषेची अभिवृद्धी या अन्योन्यसापेक्ष व अन्योन्याश्रयी बाबी आहेत. मराठी सत्तेच्या उत्कर्षाबरोबर संतसाहित्य, पंडिती काव्य व शाहिरी वाङ्मय निर्माण झाले, हा मराठी राज्याचाच परिणाम होय. इंग्रजी राजवटीची भूमिका, माणसे 'इंग्रजी भट्टीतून' निघाली पाहिजेत अशी असल्यामुळे साहजिकच त्यांचे देशी भाषांकडे दुर्लक्ष होत आहे. इंग्रज राज्यकर्त्यांच्या भाषेचा व देशी भाषांचा एकजीव होणे शक्य नसल्यामुळे, राजभाषेने आपले क्षेत्र संकुचित करून देशी भाषांना उत्तेजन दिले पाहिजे असे त्यांनी आग्रहाने सांगितले आहे.

विद्यापीठात देशी भाषांचा शिरकाव होण्यासंबंधी चर्चा करताना तसे होणे केव्हाही हितावह आहे, असे नमूद करून त्यासाठी कोणत्याही भाषेत चांगली ग्रंथरचना होणे गरजेचे असल्याचे ते प्रतिपादन करतात. त्याकरिता (१) शब्दसामग्री (२) विचारसंग्रह आणि (३) ग्रंथाची जरुरी या तीन आवश्यक बाबी होत. देशी भाषा प्रौढ दशेस येण्यासाठी संस्कृतादी प्राच्य भाषांच्या मदतीची गरज आहे. संस्कृतच्या मदतीने शब्दसामग्री सिद्ध करणे सुलभ असल्यामुळे संस्कृतची फारकत अहितकारक असल्याचे त्यांचे मत आहे. देशी भाषेतून शास्त्रीय विषय शिकविण्यास सुरुवात झाल्यास तद्नुषंगाने ग्रंथनिर्मिती होऊ लागेल व भाषेची झपाट्याने वाढ होईल. परीक्षेतील प्रश्नांची उत्तरे देशी भाषेतून देण्याची मुभा असणेही हितकारक ठरेल, अशीही सूचना त्यांनी केली आहे.

मराठी कोशरचनेचे मानदंड म्हणता येतील असे दोन कोश अव्वल इंग्रजीत तयार झाले. त्यांपैकी पहिला मोल्सवर्थ यांचा मराठी इंग्रजी कोश व दुसरा प्रो. नी.ब.रानडे यांचा इंग्रजी मराठी कोश हे होत. प्रो. रानडे यांच्या कोशाचे परीक्षण करण्याच्या निमित्ताने लोकमान्यांनी कोश आणि व्याकरण ही भाषेच्या उत्कर्षाची दोन प्रधान अंगे असल्याचा उल्लेख करून कोशरचनेची मूलभूत मीमांसा केली आहे. कोशकाराला कोणती अवधाने ठेवावयास हवीत, याचा विचार करताना ते म्हणतात, "देशात संपत्ती कितीही विपुल असली तरी तिचा एके ठिकाणी ज्याप्रमाणे व्यवस्थित संग्रह करावा लागतो तद्वत व्याकरणाच्या कसोटीस लावून शब्दरत्ने मोठ्या काळजीने आणि व्यवस्थित रीतीने संग्रहित करावी लागतात. हे

काम मोठ्या मेहनतीचे, विद्वत्तेचे, आस्थेचे आणि शोधपूर्वक विवेचनाचे असते. भाषेचे घटकावयव काय, प्रसंगानुरूप यौगिक आणि व्युत्पत्तिदृष्ट्या समानार्थक शब्दांची रूढ भाषेत भिन्नार्थी योजना कशी करतात, त्यातील भेदाभेद कोणते आणि पहिल्यापासून तसेच कायम आहेत की भाषेच्या वाढीबरोबर बदलत चाललेले आहेत, नव्या कल्पना, नवे विचार भाषेमध्ये येण्यास जी द्वारे आहेत, ती भाषेच्या अभिवृद्धीस पुरेशी विस्तृत आहेत, की अधिक विस्तृत करावयास पाहिजेत, एकच भाषा बोलणारे; परंतु निरनिराळ्या प्रांतांत राहणारे अशा लोकांत प्रयोगांची किंवा शद्बांची निरनिराळी स्वरूपे कशी होतात, त्यातील ग्राह्य कोणती 'अग्राह्य' कोणती, शुद्ध कोणती, अशुद्ध कोणती इत्यादी अनेक गोष्टींचे धोरण ठेवून कोशकारास आपले काम करावे लागते." या उताऱ्यात कोशरचनेतील शद्बसंग्रह, शद्बांची रूपे व व्याकरण, अर्थलेखन, अर्थपरिवर्तन, व्युत्पत्ती इत्यादी कोशरचनेच्या सर्व अंगांचा उल्लेख असून पुढे त्यांचा परामर्शही घेण्यात आला आहे. प्रस्तुत कोश हा इंग्रजी मराठी कोश असल्यामुळे व इंग्रजीसारख्या प्रगत व प्रगल्भ भाषेतील शद्बांचा विशेषतः वैज्ञानिक संज्ञांचा मराठीत अर्थ व शक्यतो प्रतिशद्ब देणे हे मोठेच अवघड काम होते. प्रो. रानडे यांनी त्या त्या विषयांतील तज्ज्ञांच्या साह्याने ते उत्तम प्रकारे पार पाडले आहे, याची लोकमान्यांनी प्रशंसा केली आहे. "परिभाषा ठरविणे अथवा ठिकठिकाणी जे शद्ब पूर्वीच बनविले असतील. त्यातील ग्राह्य कोणते अग्राह्य कोणते हे ठरवून त्याप्रमाणे इंग्रजी भाषेतील शद्बास प्रतिशद्ब देणे हे हल्लीच्या परिस्थितीत इंग्रजी भाषेतील शद्बांचा देशी भाषेत परिपाक करू इच्छिणाऱ्या कोशकाराचे कर्तव्य आहे." इंग्रजी मूळ शद्ब व त्यावरून बनलेले साधित शद्ब यांची उदाहरणे घेऊन या जटिलं प्रश्नांची सोडवणूक करण्याच्या प्रो. रानडे यांच्या प्रयत्नाचे लोकमान्यांनी कौतुक केले आहे. हा सर्व निबंधच कोशरचना करू पाहणाऱ्या सर्वांना मार्गदर्शक ठरेल असा आहे.

मराठी शुद्धलेखन या नावाने परिचित असलेला विषय म्हणजेच मराठी भाषेची लेखन पद्धती हा विषय होय. हा विषय गेली शे-दीडशे वर्षे विशेषतः गेले शतकभर विद्वान मंडळीत चर्चेचा व वादविवादाचा विषय होऊन राहिला आहे. आजही या विषयावर वृत्तपत्रांतून उलट सुलट टीकाटिप्पणी चालू आहे. साहित्य महामंडळाने मान्य केलेल्या नियमांना शासनाने १९६२ मध्ये मान्यता दिली तेव्हापासून हे नियम शासन व्यवहारात अधिकृत म्हणून मानले जातात. तथापि

त्यांचे सार्वत्रिक परिपालन होत नाही. अनेक लेखक अजूनही जुन्या लेखननियमांप्रमाणे आपले लेखन करीत आहेत.

बरोबर १०० वर्षांपूर्वी म्हणजे १९०० मध्ये सर्वश्री साने, गोडबोले व हातवळणे या 'मुनित्रयांनी' मराठी भाषेची लेखनपद्धती हा ग्रंथ प्रसिद्ध केला. लोकमान्यांनी 'केसरी'त चार लेखांकांत या ग्रंथाचे परीक्षण केले असून या संदर्भातील आपली भूमिकाही मांडली आहे. ते म्हणतात, "लोकांमध्ये जे शद्ब, अक्षरे, वर्णन, प्रयोग किंवा उच्चार प्रचलित आहेत तेच घेऊन त्यांस लागू होतील असे सामान्य नियम किंवा अपवाद शोधून काढणे आणि सदर नियमापवादांची शास्त्रीयदृष्ट्या व्यवस्था लावणे हे वैयाकरणाचे पहिले कर्तव्य होय. शद्बास शिस्त लावणे हे जरी व्याकरणशास्त्रकाराचे कर्तव्य आहे, तरी शास्त्रकारास मन मानेल त्याप्रमाणे वागता येत नाही, 'तूं काय केलेंस' या प्रयोगास सतरा व्याकरणकारांनी अशुद्ध म्हटले, तरी मराठी भाषा बोलणारांनी त्यास जोपर्यंत सोडले नाही तोपर्यंत कोणत्या तरी अपवादाखाली म्हणून व्याकरण नियमात त्याचा समावेश केलाच पाहिजे." व्याकरणकारांची लक्ष्मणरेषा याप्रमाणे ठरवून पुढे लेखनपद्धतीतील मुख्य प्रश्न 'मराठी शद्ब, विशेषकरून अन्त्य किंवा उपान्त्य वर्ण किंवा अनुस्वार हे कसे लिहावे हा आहे' असे ते नमूद करतात. संस्कृतचे अभिमानी संस्कृत शद्बास मराठी भाषेत निराळ्या रीतीने लिहिणे प्रशस्त नाही, असे म्हणतात. दुसरा पक्ष मराठी भाषेचे म्हणून स्वतंत्र नियम आहेत व ते नियम संस्कृत शद्बासही लावले पाहिजेत असे म्हणतो. तिसरा पक्ष उच्चारशरण आहे, तर चौथा पक्ष व्युत्पत्ती, भाषेची सोय आणि उच्चार या सर्वांस सारासार विचाराने महत्त्व देऊन लेखनपद्धतीचे नियम ठरवावेत, असे म्हणतो.

उच्चाराप्रमाणे लेखन करावयाचे म्हटल्यास कोणाचे उच्चार प्रमाण मानावयाचे? सुशिक्षित वर्गाचे की अशिक्षित वर्गाचे? सुशिक्षित वर्गाच्या उच्चारात तरी एकरूपता आहे काय? कोकण, देश, विदर्भ, मराठवाडा या ठिकाणांच्या सुशिक्षित वर्गाचे उच्चार सारखे आहेत, असे म्हणता येणार नाही. उच्चार पाहून शद्ब लिहावयाचे म्हटले तर भाषेस स्थैर्य व निश्चितपणा यावयाचा नाही. उच्चाराप्रमाणे लिहिणे नेहमी शक्य नाही, याची इतरही कारणे आहेत.

"व्युत्पत्तीकडे लक्ष न देता केवळ उच्चारावरून लेखनपद्धती ठरवावयाची म्हटले तर लिहिण्याची भाषा दर पंचवीस-तीस वर्षांनी पालटावी लागेल व लिहिण्याच्या भाषेत कायमपणा राहणार नाही." भाषा ही प्रवाही असल्यामुळे









शद्बांचे उच्चार बदलत राहतात म्हणून उच्चार हा एकमेव निकष स्थैर्याच्या दृष्टीने शबल आहे. "जिभेपेक्षा लेखणी जात्याच अधिक स्थिर आहे," म्हणून लेखनपद्धतीस सर्व भाषांत महत्त्व असते.

'उच्चारांच्या संख्येपेक्षा अक्षरांची संख्या कमी असते' हे 'च' वर्गाच्या तालव्य व दंततालव्य उच्चारांचे व शद्बांतील जोर देऊन व बिनजोराने उच्चारावयाच्या अक्षरांचे उदाहरण देऊन त्यांनी स्पष्ट केले आहे.' वेदांतील मंत्रांचे बरोबर उच्चार कायम रहावे म्हणून प्रत्येक स्वराचे ऱ्हस्व, दीर्घ आणि प्लुत यांखेरीज उदात्त, अनुदात्त आणि स्वरित व संवृत आणि विवृत अशा पाणिनीने केलेल्या भेदांचीही या संदर्भात लोकमान्यांनी चर्चा केली आहे. या सर्व बाबी लेखनचिन्हांनी दाखविणे नित्याच्या लिखित भाषेत अशक्यप्राय आहे. "जी भाषा आम्ही नेहमी प्रचारात बोलतो त्यातील शद्बांचे उच्चार आमच्या अंगवळणी किंवा जिव्हावळणी पडत असल्यामुळे आमच्या लक्षात वर दिलेले बारीकसारीक भेद येत नाहीत."

प्रचलित उच्चारांकडे दुर्लक्ष करू नये हे आवर्जून नमूद करून वैयाकरणांनी उभय पक्षांचा मिलाफ घडवून नियम करावेत, असे त्यांनी सुचविले आहे. 'मराठीचे म्हणून काही स्वतंत्र रूप असले तरी सांप्रतच्या मराठीच्या बाल्यावस्थेत संस्कृतला बाजूला सारून चालणार नाही. तसेच 'ऱ्हस्व, दीर्घ, सानुनासिक, निरनुनासिक शद्बांची अगर वैकल्पिक रूपांची आजच एकदम व्यवस्था लावून टाकून मराठीसारख्या वाढत्या भाषेला जखडून टाकू नये. परिवर्तनाला अवकाश ठेवावा,' असा त्यांचा अभिप्राय आहे.

१) ऱ्हस्व इकारान्त व उकारान्त तत्सम शद्बांचे (रवि, कवि, भानु, गुरु इ.) अन्त्यस्वर दीर्घ लिहावे की ऱ्हस्व हा प्रश्नही शंभर वर्षांपासून चर्चेत आहे. समासांत तो ऱ्हस्वच राहतो. (कविसम्राट, रविप्रभा इ.) यावर शद्बाचे मूलरूप व विभक्त्यन्त रूप असा भेद करून हे शद्ब विभक्ती रूपात दीर्घ लिहावेत असे लोकमान्यांचे मत आहे.

२) तत्सम शद्बांतील उपान्त्य ऱ्हस्व 'इ' व 'उ' (गुण, विष, सुख इ.) यांचा उच्चार मराठी भाषेच्या स्वभावाप्रमाणे दीर्घ होतो. हे शद्ब संस्कृतातल्याप्रमाणे लिहून उच्चार मराठीच्या स्वभावाप्रमाणे करावा.

३) तिसरा प्रश्न क्वचित्, विद्वान्, शरद् यांसारख्या तत्सम व्यजनान्त शद्बांचा होय. मराठीत तो प्रायः स्वरान्त लिहिण्याची वहिवाट असून त्यांची प्रत्यय लागल्यावर विद्वानास, शरदांत अशीच रूपे होतात. तेव्हा हे शद्ब स्वरान्तच



अनुक्रमणिका

लिहावेत. क्वचित्, कदाचित् सारखी अव्यये व्यंजनान्त ठेवण्यास हरकत नसावी.

४) अनुस्वार, अनुच्चारित असला तरी शद्बभेद दाखविण्यास आवश्यक असेल तर ठेवावा. मात्र व्युत्पत्तीच्या आधारे तो लादू नये.

शद्बाच्या शुद्धलेखनाचे नियम अगदी कायमचे न ठरविता सामान्यतः ठरवून काही शद्बांस थोडीशी सवलत दिल्यानेच एकंदर भाषेची वृद्धी अधिक चांगली होईल.

लोकमान्यांचे सर्व राजकारभारावर बारीक लक्ष असे. 'विद्याखात्याच्या बुक कमिटीने' परंपरागत आधी स्वर (अ, आ, इ, ई, उ) व मग व्यंजने (क, च, त, ट, प हे वर्ग) हा वर्णमाला शिकवण्याचा क्रम सोडून ग, म, भ, अशी पद्धती चालू करण्याचे सूतोवाच केले. त्यावर लोकमान्यांनी कडाडून हल्ला चढवला आहे. लेखाचे शीर्षकच मुळी 'आमच्या वर्णमालेचा खून' असे जळजळीत आहे. पाणिनीने ठरवून दिलेल्या वर्णमालेची पाश्चात्त्य भाषाविदही कशी प्रशंसा करतात हे प्रो. मक्डोनाल्ड यांच्या पुस्तकातील एक उतारा देऊन ते दाखवून देतात. तसेच जगातील पाच सर्वश्रेष्ठ विद्वानांची गणना करावयाची झाल्यास त्यात पाणिनीचे नाव घ्यावे लागेल, हे प्रख्यात भाषावैज्ञानिक ब्लूमफील्ड याचे मतही उद्धृत करतात.

लहान मुलांना अक्षरओळख करून देताना अ, आ यांतील अर्धगोल काढणे कठीण पडेल, त्यापेक्षा ग, म, भ यांतील सरळ रेषांच्या आधारे अक्षरओळख करून देणे सोपे जाईल, हा बुककमिटीचा युक्तिवाद लोकमान्यांना नामंजूर असून त्यांनी कमिटीने ही 'नस्ती उठाठेव' करू नये व ही 'वेडेपणाची सुधारणा' सोडून द्यावी, असे त्यांच्या नेहमीच्या आक्रमक पद्धतीने बजावले आहे.

मराठी भाषेच्या उत्कर्षाचा विचार करताना सुशिक्षित महाराष्ट्रीयांच्या उदासीनतेवर ते नेमके बोट ठेवतात. "इंग्रजी भाषेतून सर्व शिक्षण झाल्यामुळे मातृभाषा अनभ्यस्त व परकी वाटू लागते व सर्व विचार, लेखन, वाचन व व्यवहार इंग्रजीमय बनून जातो. मराठी भाषेचा अभिमान बाळगून सर्व दिशांना तिची अभिवृद्धी करणे आपले कर्तव्य आहे, असे महाराष्ट्रातील सुशिक्षित लोकांस वाटत नाही, तोपर्यंत महाराष्ट्र भाषा चांगल्या नावारूपास येण्याची आशा नको.

भारतातील इतर प्रांतांत चालू असलेल्या भाषा व साहित्यविषय कामाचा हवाला देऊन त्या तुलनेत महाराष्ट्रात अगदीच शुकशुकाट असल्याचे ते नमूद करतात. दक्षिणा प्राइज कमिटी आणि डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटी

यांच्यातही फारशी धुगधुग जाणवत नाही, असे निरीक्षणही त्यांनी नोंदले आहे व एखादी महाराष्ट्रीय सभा स्थापन होऊन तिने महाराष्ट्र भाषेच्या इतिहास संशोधनादी सर्वांगीण विकासाचे कार्य हाती घ्यावे, असे सुचविले आहे.

'महाराष्ट्र भाषेची वाढ' या विषयावर लोकमान्यांनी 'केसरी'त ओळीने तीन लेख लिहिले आहेत. विशेष नमूद करण्यासारखी गोष्ट म्हणजे हे लेख कुठल्याही निमित्ताने वा घटना प्रसंगांमुळे लिहिलेले दिसत नाहीत. याच सुमारास म्हणजे १९०६ मध्ये मे महिन्यात पुणे येथे पहिले ग्रंथकार संमेलन भरले व यातूनच पुढे महाराष्ट्र साहित्य परिषदेचा जन्म झाला. या घटनेशी या लेखनाचे नाते कदाचित जोडता येईल.

पहिल्या लेखात लोकमान्य भाषेची उत्क्रान्ती व मानवी जीवनातील तिचे अनन्यसाधारण महत्त्व, मराठीचा जन्मकाल व यादवकालात झालेली तिची भरभराट व निर्माण झालेला ज्ञानेश्वरीसारखा श्रेष्ठ ग्रंथ यांचा उल्लेख करतात. "समाजाचा व्यवहार, समाजाचे विचार, समाजाचा व्याप आणि समाजाची भाषा यांच्यामधील संबंध इतका निकट आणि नित्य आहे की एकाची वृद्धी तर दुसऱ्याची वृद्धी आणि एकाचा क्षय तर दुसऱ्याचा क्षय असा सिद्धान्त बांधता येतो." राजकीय, सामाजिक परिस्थिती आणि भाषा यांच्या उत्कर्षापकर्षाची सांगड या लेखनात सर्वत्र आढळते.

पुढे लगेचच मुसलमानी राजवट स्थापन झाली. राज्यकर्त्यांच्या भाषेचा, अभिजनवर्गावर प्रभाव असल्यामुळे वस्तुतः या काळात मराठीची पिछेहाट होणे अपेक्षित होते; पण सत्तीची बाटवाबाटवी वा वतने बुडवून मुसलमानी धर्माचा प्रसार करण्याची राज्यकर्त्यांची चाल असल्यामुळे त्याचा धार्मिक अधिष्ठानावर प्रतिकार करण्याची ऊर्मी बळकट झाली व त्यातूनच सर्व समाजातील धार्मिक पायावर बरोबर नेणारे संतसाहित्य निर्माण झाले, अशी लोकमान्यांची मीमांसा आहे. ज्ञानेश्वरांपासून रामदासांपर्यंतच्या संतमंडळींची कामगिरी याच भूमिकेतून पाहिली पाहिजे व हे संतांचे एक प्रकारे राष्ट्रीय कार्यच आहे, असे त्यांचे प्रतिपादन आहे.

छत्रपती शिवाजीमहाराजांचा उदय याच दृष्टीने पाहिला पाहिजे. शिवकालात राज्यव्यवहारकोश निर्माण झाला. पुढे संतसाहित्याबरोबर पंडितीसाहित्य तसेच शाहिरी व लावणी वाङ्मय निर्माण झाले. मराठीचा प्रसार इंदूर, ग्वाल्हेर, बडोदे, तंजावर असा दूरदूरवर झाला.

इंग्रजी राजवटीत राज्यकारभार इंग्रजीत होऊ लागल्यामुळे मराठीच्या वापराचे क्षेत्र आकसले. देशी संस्थानांतूनही हळूहळू तिचे उच्चाटन होऊ लागले. शिक्षण इंग्रजी माध्यमातून होऊ लागल्यामुळे सुशिक्षित वर्ग मराठीला पारखा होत

चालला. अशाप्रकारे "सुशिक्षित वर्ग स्वभाषेचा अहेतुक शत्रू बनला. भाषेची वाढ होण्यास मुख्य साधन त्या भाषेत व्यवहार चालणे हे होय. हा व्यवहार जितका जास्ती तितकी भाषेची वृद्धी किंवा फैलाव जास्त होतो. व्यापारी लोक व्यापारासाठी मराठीत व्यवहार करू लागले. नव्या शास्त्राचे अध्ययन व अध्यापन याच भाषेत होऊ लागले तर मराठी भाषेचा हां हां म्हणता उत्कर्ष होईल." ..... "कथा-कादंबऱ्यांची निर्मिती म्हणजे भाषेची वाढ नव्हे. त्यांचे आयुष्य पतंगाप्रमाणे दोन-चार महिन्यांपेक्षा अधिक असत नाही. वर्तमानपत्रांच्याद्वारे भाषेची एक प्रकारची वाढ होत आहे; पण ही वाढ चिरस्थायी स्वरूपाची नाही." ..... "युनिव्हर्सिटीत एका परीक्षेत ज्ञानेश्वरी ठेवल्याने भाषेची वाढ होण्याची आशा बाळगणे व्यर्थ होय. खरा उपाय सर्व अभ्यासक्रम मराठीत ठेवणे हा आहे." ..... "सुशिक्षितांनी आपल्याला मिळालेले ज्ञान स्वभाषेच्याद्वारा लोकांस शिकविणे हे आपले कर्तव्य समजून उद्योग करण्यास आरंभ केला तर मराठी भाषेची अभिवृद्धी अधिक होईल, अशी खात्री वाटते. म्हणून सुशिक्षितांनी ग्रंथनिर्मितीकडे लक्ष दिले पाहिजे. ब्रिटिश राजवटीच्या प्रतिकूल कालात भाषेच्या अभिवृद्धीचा हाच एक मार्ग आहे." भाषाभिवृद्धीच्या संदर्भातील लोकमान्यांचे शंभर वर्षांपूर्वीचे हे विचार आजही तंतोतंत लागू होणार आहेत.

लोकमान्य टिळकांनी वेळोवेळी भाषिक प्रश्नावर दिलेली भाषणे शेवटी संग्रहित केली आहेत. प्रसंगानुरूप व्यक्त केलेले काही विचार वगळता आतापर्यंतच्या संकलित लेखनात ज्या मुद्द्यांची चर्चा आली आहे, तेच कमी-अधिक प्रमाणात या भाषणातून मांडलेले आहेत.

बनारसच्या नागरी प्रचारिणी सभेच्या डिसेंबर १९०५ मध्ये भरलेल्या अधिवेशनात A Standard Character For Indian Languages या विषयावर त्यांनी केलेल्या भाषणाचा मुद्दाम उल्लेख केला पाहिजे. सर्व भारतीय भाषांसाठी एक समान लिपी असावी, ही त्यामागची भूमिका आहे. भारताची एक राष्ट्र म्हणून जडणघडण व्हावी, हा त्यांच्या चिंतनांचा एक कायम विषय राहिलेला आहे. समान भाषा हा एकराष्ट्रीयत्वाचा एक महत्त्वाचा निकष आहे. त्या दृष्टीने राष्ट्रभाषा म्हणून हिंदीचा पुरस्कार त्यांनी केला आहे. यासाठी समान लिपी उपकारक होईल व ती देवनागरी असावी, असे त्यांचे प्रतिपादन आहे. रोमन लिपीचाही या संदर्भात त्यांनी विचार केला असून, भारतीय भाषांतील ध्वनी व्यक्त करण्याकरिता ती अक्षरे अत्यंत अपुरी आहेत व म्हणून ती लिपी भारतीय भाषांसाठी अयोग्य आहे,

असे मत व्यक्त केले आहे. देवनागरी लिपी ही तुलनेने अधिक शास्त्रशुद्ध असून सुरुवातीला संस्कृतोद्‌भव भाषांसाठी तिचा अंगीकार करावा. हिंदी, बंगाली, गुजराती, मराठी, गुरुमुखी (पंजाबी) या भाषांनी देवनागरी अंगीकृत केली तर स्वेतर भाषकांना त्या भाषा अर्ध्याअधिक प्रमाणात समजू लागतील व राष्ट्रीय एकात्मकतेच्या दृष्टीने ते फार उपकारक ठरेल, अशी त्यांची भूमिका आहे.

आई-बाप आपल्याला निवडता येत नाहीत. त्याप्रमाणे भाषाही आपल्याला निवडता येत नाही. ती निसर्गतःच आपल्याला मिळालेली देणगी आहे. तिच्या उत्कर्षाचा मनोभावे व कळकळीने प्रयत्न करणे हे सुशिक्षित वर्गाचे कर्तव्य आहे, हे सूत्र या सर्व लेखनातून प्रतीत होते. आपल्या भाषिक वारशाचा सार्थ अभिमानही पहावयास मिळतो.

भाषाविज्ञान, व्याकरण, शुद्धलेखन यांसारखे तांत्रिक विषयही किती सोपे व सुबोध करता येतात याचा धडाच लोकमान्यांनी या लेखनात घालून दिला आहे. ठाम व ठाशीव प्रतिपादन, बिनतोड युक्तिवाद, सुस्पष्ट मांडणी हे त्यांच्या शैलीच्या इतर गुणविशेषांचे दर्शनही येथे होते. अन्वर्थक संस्कृत सुभाषिते, स्वमतपुष्ट्यर्थ दिलेली इंग्रजी अवतरणे यांची पखरणही त्यांच्या इतर लेखनाप्रमाणे इथे आहेच. आवश्यक तिथे उपरोध व वक्रोक्तीचे हत्यारही त्यांनी वापरले आहे. "रावसाहेब बोलले; पण सांभाळून बोलले"; "इंग्रजांचे राज्य आमच्यावर झाले म्हणून ते आमच्या भाषेतील सर्व ऱ्हस्व-दीर्घ, वेलांट्यावर झालेच पाहिजे असा काही कायदा नाही." इतरत्रही "परकीय भाषेतील शब्द घ्यावेत; पण ते 'पिठात मीठ' या न्यायाने घेतले तर ते स्वभाषेस पथ्यकर व रुचकर होतात. नाहीपेक्षा सर्व भाकरी खारट होऊन जाते." अशी चमकदार वाक्येही आढळतात.

मराठी भाषेचे अभ्यासक या लेखनाचे यथोचित स्वागत करतील असा विश्वास वाटतो.

■

**५, फुलराणी, साहित्य सहवास, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१**

# ‘संगणकासाठी मराठी’च्या निमित्ताने केलेले भाषाचिंतन

अ. रा. यार्दी

महाराष्ट्रात पहिलीपासून इंग्रजी विषय शिकविण्याचा निर्णय घेण्यात आला, ही स्वागतार्ह गोष्ट आहे. हा निर्णय घेण्यापूर्वी सरकारने शिक्षणतज्ज्ञांचा सल्ला घेतला असणारच. मुले लहानपणी कोणतीही भाषा चटकन आत्मसात करतात, ही गोष्ट खरी असली तरी मुलांना इंग्रजी भाषा लवकर अवगत होते असे माझे निरीक्षण आहे. भाषा शिकताना ती दोन प्रकारे शिकली जाते. १) बोलणे २) लिहिणे.

मूल बोलायला शिकते ते साहजिकच त्याच्या मातृभाषेतूनच. बोलायला शिकणे हे निरीक्षण, श्रवण, संवाद यांवर अवलंबून असते. त्याच्या जन्मापासूनच्या क्षणापासून त्याची अक्षरांशी ओळख होईपर्यंतचा त्याचा प्रवास हा बहुविध भाषासंस्कारांचा असतो. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध यांच्याशी त्याचा ‘सह’ज संवाद होत असतो. त्याचबरोबर त्याच्या मातृभाषेशीही त्याचा ‘सह’ज संवाद होत असतो. पण मूल जेव्हा हातात पाटी, पेन्सिल / खडू घेऊन लिहायला लागते, तेव्हा त्याच्या शिकण्यातली सहजता निघून जाते. परिश्रम येतात, बंधने येतात, मनाला विशेष परिश्रम द्यावे लागतात आणि इतके दिवस रांगून, बागडून, लोळून, स्वच्छंदीपणाचे जीवन जगल्यानंतर असे बंधन घातले जाण्याला साहजिकच विरोध होतो. पण पाटी आणि पेन्सिल / खडू यांचा स्पर्श नवीन असल्याने आपण इतकी वर्षे बोलत होतो. त्या अमूर्त भाषेला मूर्त रूप येत असल्याने, बालमन त्या भाषेशी - भाषेच्या मूर्त रूपाशी - संवाद साधायला उत्सुक असते. ही उत्सुकता मुळाक्षरे शिकून होईपर्यंत टिकून राहते. त्या मुलाची उत्सुकता कायम टिकून रहावी म्हणून अक्षरांच्या विस्तारित रूपांची - काना मात्रा, वेलांट्या, संयुक्ताक्षरे - यांची ओळख करून दिली जाते. पण त्याचबरोबर आपल्या मातृभाषेव्यतिरिक्त - किंबहुना, मी म्हणेन भारतीय भाषांव्यतिरिक्त - इतर कुठलीही परकीय भाषा मुलांना आपण शिकवू लागलो, तर मुले मातृभाषेच्या

तुलनेत परकीय भाषा जास्त लवकर आणि जास्त आवडीने शिकतात त्याची कारणे अशी संभवतात.

१) आपण लहानाचे मोठे होत असताना आपल्या कानांवर जी भाषा पडते, तीच भाषा आपण अक्षरज्ञानाच्या वेळीही शिकत असतो. अमूर्ताला मूर्त रूप देण्याच्या क्रियेतून त्यांची उत्सुकता नव्यानं चालविली जाते पण परकीय भाषा शिकत असताना - उदा. इंग्रजी - ती अक्षरे नवीन असतात, त्यांचे उच्चार नवे असतात आणि त्या अक्षरांशी एकजीव झालेल्या संस्कृतीचा वासही नवीन असतो. (भाषा ही अशी सर्वांगाने शिकली जात असावी.) म्हणून मुलांना इंग्रजी लिपी अधिक लवकर शिकता - लिहिता (येते) येत असावी.

२) मराठीतल्यापेक्षा इंग्रजीतली मुळाक्षरे निम्म्याहून कमी आहेत. याचीही तुलना बालमनात होत असावी.

३) मूर्त आणि अमूर्ताचा नव्याने होणारा ताळमेळ अधिक मोहक वाटत असावा.

४) 'अ'पासून 'ज्ञ' पर्यंत लिहितोपर्यंत लहान मुलांची सहनशक्ती संपून जात असावी. कारण त्यांच्यासमोर इंग्रजी लिपीचे, मुळाक्षरांचे लघु स्वरूप असते. ते त्यांना नवे म्हणून अधिक जवळचे वाटत असावे.

५) बाराखड्या, काना, मात्रा, वेलांट्या, संयुक्ताक्षरे यांची गर्दी इंग्रजी भाषा शिकताना आढळत नाही. म्हणून त्यांना इंग्रजी लवकर ग्रहण होत असावे. ग्रहणक्षमता ही मनाच्या शांततेवर अवलंबून असते, सहजतेवर अवलंबून असते.

६) शब्द तयार करण्यासाठीसुद्धा इंग्रजीत फार तडजोड करावी लागत नाही; पण मराठी वा भारतीय भाषांत तशी तडजोड फार करावी लागते.

जेव्हा आपण मराठी मुलांना आपली भाषा शिकवून इंग्रजी शिकवायला लागतो, तेव्हाच या प्रकारचा अनुभव येणे शक्य आहे. याउलट आधी इंग्रजी शिकवून नंतर आपली मातृभाषा शिकवून पाहिले तरी त्यांना इंग्रजीच आपली - जवळची वाटू लागते. कारण मुलांची निर्णयक्षमता अचूक असते आणि ती निरोगी तुलनेवर अवलंबून असते.

इंग्रजी भाषा शिकण्यामुळे आपल्या संस्कृतीवर विपरीत परिणाम होतो, ही भीती अनाठायी आहे. पण एक मात्र वास्तव आहे, की इंग्रजी शिकणारी मुले

धीट होतात, Social होतात असा कित्येक पालकांचा - विशेषतः यात आयांचा वाटा मोठा आहे - गैरसमज आहे. त्यामुळे न्यूनगंडाची भावना पालकांच्या मनातून पाल्यांच्या मनात नकळतपणे झिरपत जाण्याची शक्यता अधिक आहे. इंग्रजी शिकण्यामुळे एकप्रकारे आत्मविश्वास येत(च) असेल तर त्याचे रूपांतर अहंगंडात होणार नाही, याची काळजी मात्र घ्यायलाच हवी. इंग्रजी एक भाषा म्हणून शिकणे आणि इंग्रजी माध्यमाच्या शाळांमधून शिकणे या दोन वेगवेगळ्या गोष्टी आहेत. इंग्रजी एक भाषा म्हणून शिकत असताना आपण 'English Literature' शिकत असतो आणि इंग्रजी माध्यमाच्या शाळांमधून शिकत असताना 'English way of Life' शिकत असतो.

"इंग्रजी माध्यमात शिकणाऱ्या मुलांना इतर विषय चटकन समजत नाहीत व ती मुले, बऱ्याच वेळा सामान्यज्ञानात मागे पडतात असा अनुभव आहे" या मताच्या नेमका विरुद्ध अनुभव समाजात आहे. त्यामुळे दिवसेंदिवस इंग्रजी माध्यमाच्या शाळांची संख्या वाढत आहे आणि आपल्या पाल्यांना इंग्रजी माध्यमाच्या शाळांत घालण्याविषयीची 'जागरूकता' वाढीला लागली आहे.

ज्या लेखाच्या वाचनानंतर मला हे लिहावेसे वाटले, तो लेख 'संगणकासाठी मराठी' या विषयाबद्दल असला तरी मला मराठीच्या (महाराष्ट्राबाहेरील मराठीच्या) एकूण परिस्थितीबद्दल वाचकांचे लक्ष वेधावेसे वाटते.

अलीकडच्या काळात तर महाराष्ट्राबाहेर राहणाऱ्या मराठी भाषकांमध्ये मराठीबद्दलची अनास्था अनाकलनीयरीत्या वाढत आहे. आपल्या पाल्यांना मराठी शाळांत (मराठी शाळांची सोय असूनही) पाठवायचे नाही आणि स्थानिक भाषेचेही अध्ययन करायचे नाही. म्हणून मग इंग्रजी माध्यमाच्या शाळांत पाठवायचे. परराज्याची भाषा मातृभाषा म्हणून स्वीकारायची नसेल तर स्वीकारू नये, पण परभाषेचा मातृभाषेसारखा का स्वीकार करायचा? मराठी शिक्षणाची सोय नसेल तर गोष्ट वेगळी. शिक्षणाच्या सोई असूनही परराज्यातल्या मराठी मातृभाषकाने आपल्या पाल्यांना मराठी शाळांत न घातल्यामुळे एक दुष्ट चक्र निर्माण होते. शाळेत मुले कमी म्हणून इतर पालक त्या शाळेत आपल्या पाल्यांना घालत नाहीत. शाळेत मुले कमी म्हणून शिक्षकांचे दुर्लक्ष; शिक्षकांचे दुर्लक्ष होते, आपल्या पाल्यांना स्पर्धात्मक जगात वावरता येत नाही म्हणून पालक मुलांना मराठी शाळेत घालत नाहीत. परिणामतः मराठी भाषकांसाठी असलेल्या सोई परराज्यातल्या सरकारने काढून घेतल्या तर तो दोष कुणाचा? मराठी भाषा ही

भाषा म्हणून शिकण्यापेक्षा आपली संस्कृती टिकवून ठेवण्याच्या दृष्टीने मराठी शिकण्याची आज गरज आहे. आजकाल सर्वच ठिकाणी केबल चॅनल्सची सोय झालेली असल्यामुळे, मराठी वाहिनीवरचे कार्यक्रम घरबसल्या बघायला मिळतात. आपल्या मराठी संस्कारांची भूक अशा रीतीने भागविण्याची सोय झालेली असल्याने परराज्यांतले मराठी शिक्षणाचे स्थान प्रश्नचिन्हांच्या वलयात गुरफटलेले आहे. त्यात भरीस भर म्हणून आपली भाषा शिकण्यात व बोलण्यात वाटणारा कमीपणा - हा कमीपणा किंवा न्यूनगंड कमी करायचा असेल, तर आपल्या मातृभाषेबद्दल 'आपले'पण वाढले पाहिजे. केवळ 'पैसा, पैसा आणि पैसा' याच्यासाठीच शिक्षण घेत असताना आपल्या संस्कृतीच्या - भाषेच्या संस्कृतीचा - रक्षणासाठीही प्रयत्न केले पाहिजेत.

'संगणकासाठी मराठी - ही काळाची गरज' असेलही. मला संगणकाबद्दल बोलण्याचा अधिकार नाही. पण एक मात्र सांगावेसे वाटते की पहिलीपासून इंग्रजी शिकवत असताना इंग्रजीच्या साहाय्याने आपली मराठी अधिक बळकट व्यापक करण्याचा दृष्टिकोन बाळगला पाहिजे. आपण इंग्रजी शिकलो म्हणून "परदेशी कंपन्यांचाच जास्त फायदा होणार आहे"[२] ही भीती खरी असली तरी इंग्रजीचा जाणीवपूर्वक अभ्यास करण्यानेच ही भीती दूर करता येते. "आपल्या देशातील वस्तू इंटरनेटद्वारे मराठीतून आपण ग्राहकांपर्यंत पोचवायला हव्यात"[३] हेही खरे असले तरी तेवढ्याने आपले ग्राहक आपल्या देशातीलच वस्तू विकत घेऊ लागतील असे मानणे भाबडेपणाचे ठरेल. स्वदेशीचा पुकारा करूनही ही समस्या सुटणार नाही. ही समस्या सुटायची असेल तर आपल्या उद्योगपतींनी, कारखानदारांनी आपल्या मालाचा दर्जा जागतिक पातळीवर नेऊन पोचवायला हवा तेव्हाच परकीयांच्या वस्तूंचे आकर्षण कमी होईल. 'इंपोर्टेड संस्कृती'चा धोका टळेल. केवळ संगणकासाठी मराठीचे प्रोग्रामिंग करण्याने हा धोका टळणार नाही.

मराठी भाषा आणि इंग्रजी भाषा शिकण्याबाबत कुणाचे दुमत असू नये. इंग्रजी भाषा शिकण्याने मराठीचे खच्चीकरण होते असेही मानले जाऊ नये. पण आपण इंग्रजी भाषा का शिकतो, का शिकावी याचा, आपल्या भाषेच्या, संस्कृतीच्या दृष्टिकोनातून विचार करणे गरजेचे आहे. ते पालकांच्यासमोर असलेले मोठे आव्हान आहे.

**संदर्भ टीपा :**


१) *संगणकासाठी मराठी : काळाची गरज, भाषा आणि जीवन, पावसाळा २०००*

२) *तत्रैव*

३) *तत्रैव*


■


**मराठी विभाग, कर्नाटक कॉलेज, धारवाड ५८० ००१.**


---

## दॅटस् अ गुड बॉय!

'चांगला मुलगा' म्हणजे 'शांत, जागचेजागी बसणारा, विचारल्याशिवाय न बोलणारा, हातापायांचे व्यापार आवरून धरून, सांगितलेले ऐकून निमूटपणे करणारा, दिला मार खाणारा, कधीही वर तोंड न करणारा, इत्यादी इत्यादी' असाच आमचा समज असतो...... आपल्या बुडास विशेषसा धक्का किंवा पदरास विशेषसा खार लागू नये एवढ्याच दृष्टीने वरील विशिष्ट गुणान्वित मुलगा 'चांगला' असे आपण म्हणतो.....

'मला जर कोणी विचारले, चांगला मुलगा कोणास म्हणावे? तर मी..... म्हणेन, 'जो अतिशय द्वाड, अतिं चळवळ, एका जागी कधी बसावयाचा नाही, ज्याचे हात पाय, डोळे, कान, जीभ वगैरे सर्व नेहमी चालू असावयाची, आपल्या खटपटींनी आणि उपद्व्यापांनी जो आपल्या सर्व वडील माणसांस बेजार करून सोडतो, राग, त्रास, आनंद, दु:ख, प्रेम, द्वेष, माया, अभिमान इत्यादी मनोविकार ज्याचे मनात आणि तोंडावर एकसारखी पाठशिवाशिवी चालवीत असतील, ...... हरयुक्तीने आपल्या मनातले सिद्धीस नेल्याशिवाय ज्याला चैन पडावयाचे नाही, इत्यादी इत्यादी' तोच मुलगा चांगला. त्याच्या अंगी मनुष्यतेला सांगतेस नेणाऱ्या सर्व शक्तींचे अंकुर आहेत. त्या शक्तींची नीट जोपासना करणे आणि त्याच्या विनाशक स्वभावाचे रूपांतर संघातक प्रकृतीत करणे हे शिक्षणाचे काम आहे. मोडणारास जोडणारा बनवणे, हे निसर्गाचे तसेच शिक्षणाचे काम आहे. ते आज होत नाही. आज मुलाचे विनाशक चापल्य नष्ट होते; पण त्याचे रूपांतर होत नाही, त्याचा लय होतो. ..... आज त्यांचे मोडणे बंद होते व करण्याचा प्रसंगच येत नाही. त्यामुळे कित्येक बैराग्यांच्या वाळविलेल्या हाता किंवा अवयवांप्रमाणे मुलांचे क्रियासामर्थ्य नष्ट होते.

**वा. व. पटवर्धन, शिक्षण, शिक्षक व अभ्यासक्रम** (१९०६,
**संपादित आवृत्ती २०००, पृ. ५२-५३**)

---

# भाषाविषयक लेखनाची सूची : इ.स. २०००

नीलिमा गुंडी

*(टीप : 'भाषा आणि जीवन' मध्ये प्रसिद्ध झालेले लेखन यात समाविष्ट केलेले नाही.)*

**लेख :**

१. अकलूजकर प्रसन्नकुमार, 'भाषाशिक्षणाची चतु:सूत्री', महाराष्ट्र टाइम्स, १३.८.२०००, पृ. ७.

२. अकलूजकर विद्युल्लेखा, 'काळ्या पांढऱ्याचा निवाडा' (सदर - 'भाषावेध'), साप्ताहिक सकाळ, पुणे, ८.७.२०००, पृ. ३४-३५.

३. अकलूजकर विद्युल्लेखा, 'जीव (अधिकच) घाबरा करणारी भाषा', (बहुलेखकी सदर 'संसार भाषेचा') अंतर्नाद, एप्रिल, २०००, पृ. २९.

४. अकलूजकर विद्युल्लेखा, 'मराठीच्या अंगणात आता अमेरिकन गंगाजमनी', साप्ताहिक सकाळ, १.४.२०००, पृ. ३५-३६.

५. अकलूजकर विद्युल्लेखा, 'मातृभाषेचा अडसर', साप्ताहिक सकाळ, १८.३.२०००, पृ. ३८-३९.

६. आचार्य परमेश, 'इंग्रजी कोणत्या वयापासून?', (भाषांतर - संजीवनी कुलकर्णी), पालकनीती, पुणे, १६.१.२०००, पृ. ४-६.

७. कापसे स्मिता, 'भाषा, साहित्य व मूल्यविचार', ललित, जुलै, २०००, पृ. ३९-४६.

८. कुलकर्णी वि.गो., 'पहिलीपासून इंग्रजी, सावधान वर्ग हितशत्रूंचा आहे!', लोकसत्ता (रविवार), २.१.२०००, पृ. ३.

९. केळकर अशोक, 'अंतर्नाद आणि भाषेचा अंतर्नाद', ('संसार भाषेचा'), अंतर्नाद, दिवाळी, २०००, पृ. ८१-८३.

१०. केळकर अशोक, 'इंग्रजीचे अध्यापन : काही कळीच्या प्रश्नांचा विचार

करायलाच हवा', साप्ताहिक सकाळ, पुणे, २२.४.२०००, पृ. ४-७ व ११.
११. केळकर अशोक, 'एका धोंड्यात दोन पक्षी गारद', लोकसत्ता, लोकरंग पुरवणी, ९.१.२००, पृ. १ व ३ / साधना साप्ताहिक (पुणे), १५.१.२०००, पृ. १०-१३.
१२. गुंडी नीलिमा, 'खाणे : एक भाषिक व्यवहार', ('संसार भाषेचा'), अंतर्नाद, फेब्रुवारी, २०००, पृ. ४५.
१३. गुंडी नीलिमा, 'व्यक्ति आणि वल्ली' - भाषाशैलीची वैशिष्ट्ये', नवभारत, जुलै, २०००, पृ. २५-२८.
१४. गुंडी नीलिमा, 'शद्ब : मुलांचे सवंगडी', अंतर्नाद, (संसार भाषेचा), ऑगस्ट, २०००, पृ. ५३-५४.
१५. गोखले द.न., 'अनुच्चारित अनुस्वारांचा कबुली जबाब', पूर्वार्ध - लोकसत्ता, लोकरंग पुरवणी, १६.४.२०००, पृ. ५, उत्तरार्ध, लोकसत्ता, लोकरंग पुरवणी, २३.४.२०००, पृ. ५.
१६. चंदावरकर मीना, 'पहिलीपासून इंग्रजी - का, कशी आणि विरोधक', साधना साप्ताहिक (पुणे), १५.१.२०००, पृ. १४-१८.
१७. जोशी शुभदा, 'दुष्काळात तेरावा महिना', ('पहिलीपासून इंग्रजी शिक्षण' या संदर्भातील मतमतांतरे - संकलन), पालकनीती, (पुणे), १६.१.२०००, पृ. ७-९.
१८. ठोमरे उमाकांत, 'पहिल्या इयत्तेपासून इंग्रजी सुरू करावे काय?', 'महाराष्ट्र टाइम्स', २.४.२०००, पृ. ११.
१९. डहाणूकर शरदिनी, 'भाषा आणि औषध निर्मिती', अंतर्नाद ('संसार भाषेचा') जुलै, २०००, पृ. ३७-३८.
२०. डुम्बरे सदा, 'मराठीचा बुक्का कपाळी राखायचा तर आता इंग्रजीची तलवार हाती हवी!', साप्ताहिक सकाळ, १२.२.२०००, पृ. ४-७.
२१. दांडेकर वा.ना., 'पहिलीपासून इंग्रजी - निश्चित दिशा हवी', सकाळ (पुणे), २८.१.२०००, पृ. ४.
२२. देव विजया, 'भाषेची आडवळणे', अंतर्नाद, ('संसार भाषेचा') ऑगस्ट, २०००, पृ. ३७-३८.
२३. देशपांडे स.ह., 'शैलीकर पु.ल.', महाराष्ट्र साहित्य पत्रिका, ऑक्टोबर -

डिसेंबर, २०००, पृ. ६७-७४.

२४. पळशीकर वसंत, 'इंग्रजीचा वरचष्मा', नवभारत, सप्टेंबर, २०००, पृ. तीन-तेरा.

२५. प्रधान हेमचंद्र, 'सर्वांसाठीच्या विज्ञानाची भाषा', लोकसत्ता, लोकरंग पुरवणी, २६.३.२०००, पृ. ५.

२६. बडवे नीती, 'इंग्रजीची सक्ती पहिलीपासून नको', रविवार सकाळ, पुणे, ३०.१.२०००, पृ. ५.

२७. बर्नसन मॅक्सीन, 'जीव घाबरा करणारी भाषा', ('संसार भाषेचा'), अंतर्नाद, जानेवारी, २०००, पृ. ५८-५९.

२८. बर्नसन मॅक्सीन, 'पहिलीपासून इंग्रजी - ना परिस्थितीचे भान ना शास्त्राची जाण', महाराष्ट्र टाइम्स, २.६.२०००, पृ. ४, ७, ११.

२९. बापट वसंत, 'इंग्रजी भाषा नको, विद्या हवी,' साधना साप्ताहिक (पुणे), १५.१.२०००, पृ. ७-८.

३०. बिनीवाले अविनाश, 'बोलु कवतिके', (दर रविवारी लोकसत्तामध्ये समाविष्ट सदर), लोकरंग पुरवणी, पृ. २.

३१. भवाळकर तारा, 'मायबोलीमधले धक्के आणि हिसके', अंतर्नाद ('संसार भाषेचा'), मे, २०००, पृ. ७६-७७.

३२. भागवत गीता, 'मायबोली मराठीची ऐशीतैशी', लोकसत्ता, २८.९.२०००, लोकरंग, पुरवणी पृ. ३.

३३. भागवत वंदना, 'भाषाशिक्षण - मराठी-इंग्रजी', साप्ताहिक सकाळ (पुणे), २२.४.२०००, पृ. ८-११.

३४. मुंडले आशा, 'इंग्रजीच्या शिक्षकांसाठी', आपले महानगर, (मुंबई), १३.६.२०००, पृ. ६ / पालक शिक्षक (त्रैमासिक) पुणे, जुलै-सप्टेंबर २०००, पृ. ६.

३५. मुंडले आशा, 'पहिलीपासून इंग्रजी', आपले महानगर, (मुंबई), १३.६.२०००, पृ. ६.

३६. मुंडले आशा, 'मराठीतील शिव्याशाही', अंतर्नाद, ('संसार भाषेचा'), मार्च, २०००, पृ. ३१-३२.

३७. मोरे रामकृष्ण, 'इंग्रजीची दहशत घालवण्यासाठीच हसतखेळत इंग्रजी शिक्षण', (मुलाखतकार हरी नरके), साधना साप्ताहिक, पुणे,

१५.१.२०००, पृ. ४-६.
३८. मोरे रामकृष्ण, 'वाघिणीच्या दुधाचे आव्हान', महाराष्ट्र टाइम्स, २३.७.२०००, पृ. ७.
३९. रेगे बापूसाहेब, 'पहिलीपासून इंग्रजी - नववर्षाची आगळीवेगळी देणगी', रविवार लोकसत्ता, ६.२.२०००, पुरवणी पृ. ५.
४०. वैद्य पु.ग., 'शासनाच्या बुद्धीची दिवाळखोरी दर्शविणारा निर्णय', साधना साप्ताहिक, पुणे, १५.१.२०००, पृ. ९-१०.
४१. शहा मृणालिनी, 'भाषा : माझ्या मनातली!', अंतर्नाद, (संसार भाषेचा), जून, २०००, पृ. २९-३१.
४२. शहा मृणालिनी, 'म्हणी : सामाजिक अनुभवाचा इतिहास', अंतर्नाद, (संसार भाषेचा), ऑक्टोबर २०००, पृ. ३७-३८.
४३. शेख यास्मिन, 'बालादपि सुभाषितं ग्राह्यम्', (भाषावेध), अंतर्नाद, दिवाळी, २०००, पृ. ९९-१०१.
४४. सामंत सत्त्वशीला, 'कैफियत अनुस्वारांची', लोकसत्ता, लोकरंग पुरवणी, लेखांक १ : २७.२.२०००, पृ. ३ लेखांक २ : ५.३.२०००, पृ. ३ व लेखांक ३ : १२.३.२०००, पृ. ३.
४५. सामंत सत्त्वशीला, 'जोडाक्षरे की तोडाक्षरे', लोकसत्ता, लोकरंग पुरवणी २०.८.२०००, पृ. ५.

**पुस्तके :**

१. कानिटकर य.शं., (संपा.) "लोकमान्य टिळक यांचा भाषाविचार", लोकमान्य टिळक स्मारक ट्रस्ट, पुणे.
२. गुंडी नीलिमा, "शब्दांची पहाट" (बालभाषा - निरीक्षणपर लेख समाविष्ट), ग्रंथाली ज्ञानयज्ञ, मुंबई.
३. ठकार वि.शं., "पर्याय शब्दकोश - (मराठी-मराठी-इंग्रजी), मेहता प्रकाशन, पुणे.
४. तावरे स्नेहल, "मराठी शुद्धलेखन नियमावली", स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे.
५. बिनीवाले अविनाश, "भाषा : आपली सर्वांचीच", राज्य मराठी विकास संस्था, मुंबई.
६. बेलवलकर सुमन, "बेलभाषा", राज्य मराठी विकास संस्था, मुंबई.
७. भाटवडेकर मो.वि. "मराठी पर्यायी शब्दांचा कोश", साधना प्रकाशन, पुणे.

८.  माहुलकर दिनेश, “वृद्धि: भाषेचे आणि भाषाभ्यासाचे विकसन”, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई.
९.  क्षीरसागर श्री.के. “मराठी भाषा : वाढ आणि बिघाड” (संकलन - शकुंतला क्षीरसागर), राज्य मराठी विकास संस्था, मुंबई.

■

३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, पुणे ४११ ००२.

---

## जन्मभाषा, पूर्वज आणि आपण

कोणत्याही देशात मुलाला जर काही शिकविणे अवश्य असले तर ती त्याची जन्मभाषा होय. ती भाषा म्हणजे तो व त्याचे पूर्वज, वर्तमान व भूत, तो व त्याचे शेजारी, तो व त्याचा समाज यांचे एकत्व ठरविणारे नाते असते. महाराष्ट्रातील प्रत्येक मुलास महाराष्ट्राची भाषा शिकावयाची नाही तर काय शिकवावयाचे? आमच्या अंगात जसे आमच्या सर्व पूर्वजांचे अंशतः वास्तव्य आहे, त्याचप्रमाणे आमच्या जन्मभाषा म्हणजे आमच्या पूर्वजांच्या अंतरात्म्यांचे निःश्वास आहेत. त्यांचे विचार, त्यांचे विकार, त्यांचे राग, त्यांचे लोभ, त्यांच्या महत्त्वाकांक्षा, त्यांच्या आवडीनिवडी, त्यांच्या प्रेमाचे धागे, त्यांच्या कल्पनांचे तरंग, त्यांच्या बुद्धीचे वैभव, त्यांच्या प्रतिभेचे तेज, त्यांच्या मनाच्या भराऱ्या, त्यांच्या हृदयांच्या उड्या, त्यांच्या स्नायूंतील स्फुरण, त्यांच्या मनगटातील जोर, त्यांच्या अभिमानाचे सार, त्यांच्या भक्तीचे भाव, जे जे काही त्यांचे होते, त्या सर्वांनी त्या खचलेल्या आहेत. आम्हांस आमच्या पूर्वजांशी बांधून टाकणारे ज्ञानरज्जू हे! हे तोडण्याचा प्रयत्न जो शिक्षणक्रम करतो तो आमचा घात करणारा होय. .... आमच्या भाषेचा अभ्यास म्हणजे पूर्वजांशी संवाद होय. .... शेक्सपिअरची, मिल्टनची, वेलिंग्टनची, नेल्सनची म्हणून जसा इंग्रजी भाषेचा इंग्रजास अभिमान आणि तिच्या अध्ययनाची गोडी, तशीच ज्ञानेश्वराची, एकनाथाची, तुकारामाची, पंडितांची, पंतांची, शिवाजीची, रावबाजीची, नाना फडणविसाची, महादजी शिंद्यांची जी मराठी भाषा तिचा आम्हां महाराष्ट्रीयांस अभिमान वाटला पाहिजे. तिचे अध्ययन आम्ही आवडीने केले पाहिजे. .... देश भाषांच्या अभ्यासाबरोबर इंग्रजी शिका; पण देशभाषेस सोडू नका.

**वा. व. पटवर्धन, शिक्षण, शिक्षक व अभ्यासक्रम**
**(१९०६, संपादित आवृत्ती २०००, पृ. ३७-९)**

---



अनुक्रमणिका







## पुस्तक परीक्षण : एक

# शिक्षणावरचे मराठीतले पहिले स्वतंत्र विचाराचे पुस्तक

जनार्दन वाघमारे

*[लेखक : वासुदेव बळवंत पटवर्धन. शिक्षण, शिक्षक व अभ्यासक्रम, मुंबई : राज्य मराठी विकास संस्था, २०००. तेहतीस + १८६ पृष्ठे. १६० रुपये., १९०६ मध्ये प्रथम प्रकाशित; या नव्या आवृत्तीची प्रस्तावना, संपादन : रमेश पानसे. आजवर दुर्लक्षित पुस्तकाचे विशेष महत्त्व लक्षात घेऊन, शिक्षण क्षेत्रात वेगळ्या स्तरावर वेगळ्या प्रकारचे कार्य करणाऱ्या दोन प्रसिद्ध व्यक्तींची परीक्षणे दिली आहेत. - संपादक.]*

आपल्या देशात शिक्षण हा विषय तसा दुर्लक्षित राहिलेला आहे. राष्ट्रीय जीवनात त्याला अग्रक्रम कधी मिळाला नाही. त्याचे कारण असे, की शिक्षकाच्या व्यवसायाकडे उपेक्षेने पाहिले गेले. ज्ञानाची महती आपण कितीही सांगितली तरी शिक्षणाला समाज जीवनात सर्वोच्च स्थान आपण दिलेले नाही. गुरूची महानता धर्मग्रंथांचा आधार घेऊन आपण कितीही वर्णिली तरी शिक्षकाला समाजात प्रतिष्ठेचे स्थान प्राप्त झालेले नाही. आपल्या देशात इतर विषयांवर जेवढ्या प्रमाणात ग्रंथनिर्मिती झाली किंवा होत आहे, तेवढ्या प्रमाणात शिक्षण या विषयावर झाली नाही आणि होतही नाही. ज्यांचा समावेश अभिजात ग्रंथांमध्ये होऊ शकेल असे शिक्षणावर मराठीत लिहिलेले ग्रंथ फारसे सापडत नाहीत. साहित्य, विज्ञान, कृषी, अभियांत्रिकी इत्यादी क्षेत्रांत भरीव कार्य करणाऱ्या व्यक्तींचा पुरस्कार, पारितोषिके वगैरे देऊन जसा गौरव केला जातो तसा शिक्षकाचा पेशा पत्करून जिवापाड कार्य करणाऱ्या व्यक्तींचा केला जात नाही. शिक्षण आणि शिक्षकी पेशा यांकडे दुर्लक्ष झाले यात देशाच्या अप्रगतीची कारणे सापडू शकतील.

इंग्रजी अमदानीत शिक्षणाची दारे तत्त्वतः सर्वांना खुली झाली; पण ते कसे असावे या संदर्भातील धोरण ठरविण्याचा अधिकार भारतीयांना नव्हता. स्वातंत्र्य









आंदोलनात राष्ट्रीय शिक्षणावर भारतीयांनी आपले विचार मांडले. खाजगी शाळा सुरू करून राष्ट्रीय शिक्षण देण्याचा थोडासा प्रयत्नही झाला; पण तो अल्पजीवी होता. म्हणून जे शिक्षण देशात उपलब्ध होते तेच विद्यार्थ्यांना देणे भाग होते. ते देणारे बहुसंख्य शिक्षक मात्र भारतीय होते. ठरलेला अभ्यासक्रम ठरलेल्या पद्धतीने शिकविण्याचे काम ते कसेबसे पार पाडीत होते. शिक्षण म्हणजे काय, त्याची उद्दिष्टे काय असावीत, शिक्षकांची अध्यापन पद्धती कशी असावी, प्राथमिक तसेच दुय्यम (माध्यमिक) स्तरावर शिकविले जाणारे अभ्यासक्रम कसे असावेत, त्यात कोणत्या विषयांचा समावेश असावा, पाठ्यपुस्तके कशी असावीत इत्यादी प्रश्न शिक्षकांच्या मनात निर्माण होणे शक्य नव्हते. याला काही सन्माननीय अपवाद जरूर होते. प्रा. वा. ब. पटवर्धन (१८७०-१९२१) यांचा अशा अपवादात समावेश होतो. त्यांनी या प्रकारचे विवेचन 'शिक्षण, शिक्षक व अभ्यासक्रम' या त्यांच्या पुस्तकात अगदी खोलात जाऊन केले आहे.

हे पुस्तक १९०६ साली प्रसिद्ध झाले. मुंबईच्या हेमंत व्याख्यानमालेत शिक्षण या विषयावर प्रा. वा. ब. पटवर्धन यांनी दिलेल्या तीन व्याख्यानांचे हे पुस्तक आहे. प्रा. पटवर्धन हे पुण्याच्या फर्गसन कॉलेजमध्ये इंग्रजीचे प्राध्यापक होते. प्राथमिक व माध्यमिक स्तरावरील शैक्षणिक प्रश्नांचाही त्यांनी खोलात जाऊन अभ्यास केला होता. त्यांचे प्रतिबिंब 'शिक्षण, शिक्षक व अभ्यासक्रम' या पुस्तकात पडले आहे.

सुमारे एक शतकापूर्वी प्रकाशित झालेले हे पुस्तक अलीकडच्या वाचकांना उपलब्ध नव्हते. राज्य मराठी विकास संस्थेने ते नव्याने प्रकाशित केले आहे. त्यातील विचार, विवेचन आणि सूचना कालबाह्य झालेल्या नाहीत आणि म्हणून शिक्षण या विषयावरचा हा अभिजात ग्रंथ आहे, हे मान्य करावे लागेल. शतकापूर्वी शैक्षणिक प्रश्नांवर केलेल्या विचारमंथनात आजच्या शैक्षणिक प्रश्नांची उत्तरे सापडू शकतात. लेखकाने अतिशय पोटतिडकीने केलेल्या बऱ्याच सूचना आजही उपयुक्त आहेत.

(१) शिक्षण म्हणजे काय?, (२) शिक्षक, (३) शिक्षणाची तीन अंगे, आणि (४) पुढील दिशा कशी असावी, अशी चार प्रकरणे या पुस्तकात आहेत. शिक्षण, शिक्षक व अभ्यासक्रम या मथळ्याखाली लेखकाने पुस्तकाला प्रास्ताविक जोडले आहे. ज्या विषयाचे विवेचन लेखकाला करायचे आहे त्याचा त्रोटक परिचय या प्रास्ताविकात आहे.

शिक्षण ही जन्मापासून मृत्यूपर्यंत चालणारी प्रक्रिया आहे. मानवाच्या

शारीरिक व मानसिक शक्तींचा विकास करणे हेच शिक्षणाचे उद्दिष्ट आहे. लेखकाने शिक्षणाचे 'सापेक्ष' आणि 'निरपेक्ष' असे दोन भाग कल्पिलेले आहेत. शिक्षणाचा तात्त्विक विचार निरपेक्ष असतो. पण वस्तुतः शिक्षण हे कालसापेक्ष असते. ते समाजसापेक्षही असते. आपल्य गरजा आणि सामाजिक परिस्थितीचा विचार करून शैक्षणिक धोरण ठरविले जाते. व्यवहाराची जोड घेऊन बालकांच्या शारीरिक व मानसिक क्षमतांचा विकास करण्यासाठी जे शिक्षण आवश्यक असते ते सापेक्ष शिक्षण होय. स्वतंत्रपणे विचार करण्याची क्षमता विद्यार्थ्यांमध्ये निर्माण करणे आणि स्वावलंबी जीवन जगण्यासाठी त्यांच्यात कार्यक्षमता व आत्मविश्वास निर्माण करणे आवश्यक आहे. दैववाद, अंधश्रद्धा, कालबाह्य रूढी अशा गोष्टींपासून जे मुक्त करते तेच खरे शिक्षण! आपण काही व्हावे, काही करावे आणि काही समजून घ्यावे, अशी ऊर्मी प्रत्येक मुलाच्या मनात निर्माण करणे हाच शिक्षणाचा हेतू असला पाहिजे.

प्राथमिक व दुय्यम (माध्यमिक) शिक्षणाच्या प्रचलित स्थितीवर लेखकाने अंतर्मुख करणारे विचार मांडले आहेत. मुलांचे वय लक्षात न घेताच नको ते विषय प्राथमिक व दुय्यम शिक्षणाच्या अभ्यासक्रमात कोंबल्यामुळे ते दिशाहीन आणि अर्थहीन ठरलेले आहे. विषयांच्या व एकूणच अभ्यासक्रमाच्या बाबतीत निव्वळ सावळा गोंधळ आहे. यावर लेखकाने नेमकेपणाने बोट ठेवले आहे. शिक्षणात देशी भाषांची हेळसांड ही तर चिंतेचीच बाब आहे. देशी भाषा शिक्षणातून हद्दपार करण्याचाच प्रयत्न होतो आहे. मानसिक गुलामगिरीचेच हे लक्षण आहे. "इंग्रजीच्या नादास लागून देशभाषांची उपेक्षा का? देशभाषांच्या अभ्यासाबरोबर इंग्रजी शिका; परंतु देशभाषेस सोडू नका". लेखकाने हे अगदी पोटतिडकीने सांगितले आहे.

आजच्या परिस्थितीलाही हे शद्ब तंतोतंत लागू पडतात. इंग्रजीला फाजील महत्त्व दिल्यामुळे मातृभाषेकडेच पाठ फिरविली जात आहे. इतकेच नव्हे तर मुलांची वयसापेक्ष बौद्धिक क्षमता लक्षात न घेता त्यांच्यावर नको तेवढ्या विषयांचे नको तेवढे ओझे लादण्यात आलेले आहे. त्यामुळे त्यांचा बौद्धिक आणि शारीरिक विकास खुंटलेला आहे.

दुय्यम (माध्यमिक) शिक्षण बहुविध व बहुउद्देशीय स्वरूपाचे असले पाहिजे. सब घोडे बाराटक्के मानल्यामुळे सर्वांसाठी इथून तिथून एकच व सारखाच अभ्यासक्रम आणि तोही अतिशय बोजड अशी अवस्था आहे. सर्वच विद्यार्थी दुय्यम

शिक्षण संपवून विद्यापीठात जाणार आहेत, असे समजून अभ्यासक्रम तयार केला गेला आहे; पण हे चुकीचे आहे. लेखकाने जर्मनीचे अनुकरण करणे उचित ठरेल असे प्रतिपादिले आहे. जर्मनीत दुय्यम शिक्षणात बहुविधता आहे. निरनिराळे अभ्यासक्रम निरनिराळ्या व्यवसायांसाठी उपयोगी पडतील याची काळजी घेण्यात आलेली आहे. जर्मन लोकांना आपल्या भाषेचा अभिमान आहे. सर्व स्तरांवरील शिक्षणात जर्मन भाषा शिकविली जाते पण आपल्या देशात सर्वच प्रकार उलटा आहे. आपल्याला भाषांचा अभिमान वाटत नाही. आमच्या मुलांचा सर्व वेळ आणि बुद्धी इंग्रजी शिकण्यात जाते. ज्ञानग्रहण करण्याऐवजी इंग्रजी भाषा ग्रहण करण्यातच आमच्या मुलांची दमछाक होते. आपण जे शिक्षण आपल्या मुलांना देत आहोत ते फळच धरीत नाही आणि म्हणून आपली शिक्षणपद्धती वांझ ठरलेली आहे. व्यावहारिक गरजांशी ती जोडली गेलेली नाही. ती आमच्या मुलांना परावलंबी बनवीत आहे. अभ्यासक्रमांची रचनाही शिक्षणशास्त्रावर झाली पाहिजे. त्याशिवाय विद्यार्थ्यांमध्ये कर्तृत्वाचे अंकुर असे फुटतील? वर्गात निव्वळ घोकंपट्टी चाललेली असते. विद्यार्थ्यांच्या डोक्यात केवळ माहिती आम्ही कोंबीत असतो. अभ्यासक्रमात आम्ही नको त्या विषयांची नको त्या स्वरूपात माहिती कोंबलेली आढळते. असे हे कोंबणे म्हणजे शिक्षण नव्हे. हे शिक्षण 'बुद्धिविघातक' आहे असे लेखकाचे प्रांजळ मत आहे. शारीरिक श्रमाविषयी तर ते विद्यार्थ्यांच्या मनात अनादराची भावना निर्माण करते.

शाळा ही 'बाळबाग' असली पाहिजे असे लेखक आग्रहाने सांगतो. या बागेत मुलांची मने उमलावीत, ती फुलावीत आणि सुगंधित व्हावीत. पण आपल्या शाळांना कोंडवाड्याचे स्वरूप प्राप्त झाले आहे. आपण फ्रोबेलच्या शिक्षणविषयक कल्पना अमलात आणल्या पाहिजेत. फ्रोबेलियन शिक्षणपद्धती लहान मुलांच्या शारीरिक, बौद्धिक व भावनिक विकासासाठी अतिशय उपयुक्त आहे. लहान मुलांना मातृभाषेतूनच शिक्षण मिळायला हवे.

शिक्षक कसे असावेत याविषयीही लेखकाने मौलिक विचार व्यक्त केले आहेत. आपल्या शिक्षकांमध्ये अनेक दोष आढळून येतात. त्यांना मुळात शिक्षणाची आवड नाही आणि शिकविण्यात रस नाही. ते कर्तव्यदक्ष नाहीत. मुलांच्या हिताकडे ते लक्ष देत नाहीत. मुलांना त्यांचे प्रेम नाही. शिकवावे कसे हेच त्यांना कळत नाही. त्यांचा आपल्या जिभेवर, विकारांवर ताबा नाही. ते विद्यार्थ्यांना ज्ञानही देत नाहीत आणि त्यांच्यावर चांगले संस्कारही करू शकत

नाहीत. शिक्षकांना चांगले प्रशिक्षण मिळाले पाहिजे. त्याशिवाय शिकवावे कसे हे त्यांना कळणार नाही. त्यांच्यात शिकवण्याची हौस निर्माण व्हायला हवी. शिक्षणाला वाहून घेतलेले शिक्षक हवेत; पण तसे शिक्षक दुर्दैवाने मिळत नाहीत. माळी जसे बागा फुलवतात तसे शिक्षकांनी 'बाळबागा' फुलवल्या पाहिजेत.

शिक्षणक्षेत्रात ज्या घडामोडी होतात त्यांची माहिती शिक्षकांना असली पाहिजे. शिक्षणशास्त्राचीही त्यांना ओळख हवी. ज्ञानाबरोबर नैतिक मूल्यांचे संक्रमण शिक्षकांच्या माध्यमातून व्हायला पाहिजे. नैतिक शिक्षण म्हणजे धार्मिक शिक्षण असे मानण्याचे काही कारण नाही. आपल्या देशात धर्माचे शिक्षण देणे ही बाब अतिशय गुंतागुंतीची आहे. ती टाळणेच हितावह ठरेल. शिक्षणातून विद्यार्थ्यांच्या मनात सत्य, न्याय आणि समता ही मूल्ये प्रयत्नपूर्वक रुजविली पाहिजेत. राष्ट्रीय शिक्षणाची आपल्याला गरज आहे. जातिभेद आणि जाति-जमातींतील हेवेदावे कमी झाले तरच ते राष्ट्रीय ठरेल.

प्राथमिक शिक्षण सक्तीचे व मोफत असले पाहिजे यावर प्रा. पटवर्धनांनी जोर दिला आहे. वस्तुतः ती शासनाची जबाबदारी आहे पण शासन परकीयांच्या हातात असल्यामुळे या बाबतीत फारसा प्रयत्न होत नाही. अशा अवस्थेत खाजगी शाळा काढून लोकांनी प्राथमिक शिक्षणाचा प्रसार करायला पाहिजे. देशात अज्ञानाचे प्रचंड साम्राज्य पसरले आहे. दहापैकी नऊ माणसे निरक्षर आहेत. ही शोचनीय परिस्थिती बदलण्यासाठी मोफत व सक्तीचे प्राथमिक शिक्षण आवश्यक आहे. शिक्षकाला पुरेसा पगार मिळत नसेल तर गाववाल्यांनी त्याला आणखी एक बलुतेदार समजून अन्नधान्याच्या रूपाने मदत करावी, अशी सूचना लेखकाने केली आहे. त्यामागे शिक्षण प्रसाराची तळमळ आहे.

लेखकाने पहिल्या तीन प्रकरणांत अस्तित्वात असलेल्या प्राथमिक व दुय्यम शिक्षणाच्या स्थितीगतीवर प्रकाश टाकला आहे. शेवटच्या प्रकरणात पुढील दिशा कशी असावी यावर महत्त्वाचे विचार व्यक्त केले आहेत. अनेक उपयुक्त सूचना केल्या आहेत. प्राथमिक शिक्षणाच्या प्रसारावर त्याचा भर आहे. पूर्व प्राथमिक शिक्षणाचे महत्त्वही त्याने सांगितले आहे. जिथे बालक मंदिरे नाहीत तिथे प्राथमिक शाळांना बालवर्ग जोडावेत अशी एक उपयुक्त सूचना त्याने केली आहे. प्राथमिक शाळा सर्वत्र असाव्यात, प्राथमिक शिक्षणासही व्यावहारिक शिक्षणाला स्थान असावे. दुय्यम शाळांमध्ये विविध स्वरूपाचे अभ्यासक्रम असावेत. लेखकाने वेगवेगळ्या अभ्यासक्रमांची गरज लक्षात घेऊन दुय्यम शाळेचे सात प्रकार



अनुक्रमणिका

सांगितले आहेत. इंग्रजी भाषा चांगल्या प्रकारे शिकवावी; पण शिक्षणाचे माध्यम देशी भाषाच असायला पाहिजे.

शिक्षकांच्या प्रशिक्षणावर लेखकाने भर दिला आहे. त्यासाठी ट्रेनिंग कॉलेजे उघडण्याची आवश्यकता प्रतिपादिली आहे. खाजगी ट्रेनिंग कॉलेजेदेखील आवश्यक आहेत. शिक्षण ही सरकारची जबाबदारी आहेच पण लोकांनी खाजगी शाळा काढणे आवश्यक आहे. सरकारी शाळा आणि खाजगी शाळा यांच्यामध्ये देवाणघेवाण व्हावी. त्या एकमेकींना पूरक ठराव्यात. शाळांवर नियंत्रणही हवे. शाळा तपासनिसांची त्यासाठी नेमणूक करावी. त्यांनी आपले काम निर्भीडपणे केले पाहिजे. खरे तर शिक्षणाची चळवळच उभी राहिली पाहिजे. त्याशिवाय शिक्षण सर्वांपर्यंत पोहोचणार नाही. सरकारलाही त्यात लक्ष घालावे लागेल. सयाजीराव गायकवाड आपल्या बडोदा संस्थानात सर्वांना मोफत व सक्तीचे प्राथमिक शिक्षण देऊ शकतात. मग ब्रिटिश सरकारने त्याकडे दुर्लक्ष का करावे? लोकांचाही या उपक्रमात सक्रिय सहभाग हवा. "लोकशिक्षण हीच आजची देशसेवा - खरी देशसेवा - कायमचे फळ देणारी देशसेवा - हीच आज पत्करा". लेखकाचे हे आवाहन आजही अंतर्मुख करणारे आहे.

शतकानंतरही शिक्षणक्षेत्रातील बरेच प्रश्न जसेच्या तसे आपल्यासमोर उभे आहेत. विसाव्या शतकाच्या आरंभी व्यक्त केलेले हे विचार एकविसाव्या शतकाच्या उंबरठ्यावर उभे राहून चिंतन करण्यासारखे आहे. याचा अर्थ असा, की शतकाच्या प्रदीर्घ प्रवासात शिक्षणाला दोन-तीन दशकांचीच वाटचाल करता आलेली आहे.

■

**आविष्कार, श्रमसाफल्य सहनिवास, आंबेजोगाई मार्ग, लातूर ४१३ ५३१.**



अनुक्रमणिका







## पुस्तक परीक्षण : दोन

डॉ. ये. कृ. शिंदे

नवीन राष्ट्रीय शैक्षणिक धोरणात, 'जैसे थे' स्थितीऐवजी 'बदल' हा परवलीचा शब्द मानला आहे. सुव्यवस्थित रीतीने बदल घडवून आणण्याचे साधन म्हणून शिक्षणाला मान्यता मिळालेली आहे. 'बदल' ही बाब अधिक खर्चीक व कष्टदायक वाटत असेल तर त्यापेक्षा जास्त किंमत 'बदलच नको' या प्रवृत्तीसाठी मोजावी लागणार आहे. इतकेच काय तर 'बदल नको' या पर्यायासाठी यापुढे आपले सर्वस्व खर्च करूनसुद्धा तो पर्याय अधिक तापदायक व वेदनाकारक ठरणार आहे. याची प्रचिती प्रा. वासुदेव बळवंत पटवर्धन यांचे 'शिक्षण, शिक्षक व अभ्यासक्रम' हे पुस्तक वाचून आली. सुमारे शंभर वर्षांपूर्वी प्रकाशित झालेले हे पुस्तक, राज्य मराठी विकास संस्थेने सन २००० साली पुनर्मुद्रण करून मराठी वाचकांना शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न केला आहे. शिक्षणातील बदल किंवा सुधारणा या संदर्भात असणारी आपली प्रवृत्ती शंभर वर्षांपूर्वी जशी होती तशीच आजही आहे, याची धक्कादायक जाणीव पुस्तकाच्या प्रस्तावनेत प्रा. रमेश पानसे यांनी करून दिली आहे. भारतीय शिक्षणाच्या इतिहासातील पहिले महत्त्वाचे पुस्तक मराठीत लिहिले असून मराठी वाचकांना मातृभाषेचा विसर न पडावा आणि त्यांना जन्मभाषेचे महत्त्व कळावे एवढा हेतू सफल झाला तरी पुस्तक-प्रकाशनाचे सार्थक झाले असे वाटते. त्याही पुढे, शिक्षणक्षेत्रातील जिज्ञासू संशोधकानांच नव्हे तर संवेदनशील मराठी वाचकांना हे पुस्तक वाचून सात्त्विक संताप वाटला नाही तर त्यांनी जिवंत असून आपण मेलो आहोत असे समजावे. 'घाण्याचा बैल कित्येक किलोमीटर घाण्याभोवती फिरतो परंतु तो जागेवरच असतो' अशा प्रकारची जाणीव आपणा सर्वांना प्राप्त करून देण्याचे कार्य राज्य मराठी विकास संस्था व संस्थेच्या संचालिका डॉ. सरोजिनी वैद्य यांनी पुस्तकाचे पुनर्मुद्रण करून सिद्ध केले आहे, त्याबद्दल धन्यवाद.

प्रा. वासुदेव बळवंत पटवर्धन (१८७०-१९२१) हे पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयाचे इंग्रजी विषयाचे नामवंत व विख्यात प्राध्यापक असले तरी त्यांनी जन्मभाषेतूनच मुलाचे प्राथमिक शिक्षण व्हावे अशी तळमळीपोटी आग्रही भूमिका

सोडली नाही. त्यांच्याच भाषेत सांगायचे झाले तर, "आमच्यायेथील शिक्षण निरुपयोगी होते, फळ धरीत नाही, मेल्यासारखे पडते..... त्याचे प्रमुख कारण माझ्या मते देशभाषांची उपेक्षा होय.... मराठी समजत नाही म्हणून मराठीत सांगितलेले कळत नाही व इंग्रजी त्याहूनही समजत नसल्यामुळे इंग्रजीत सांगितलेले कळणे अशक्यच असते." भाषाग्रहण व ज्ञानग्रहण या दोन स्वतंत्र व वेगळ्या क्षमता असून शिक्षणाच्या प्राथमिक अवस्थेत या दोन्ही गोष्टी एकाच वेळी करण्याची शंभर वर्षांपूर्वीची चूक आपण परत करीत आहोत हे लक्षात घ्यावे. आधुनिक संगणकाचा उगम मानवी मेंदतूनच झाला असून महासंगणकापेक्षा ज्यांचे मेंदू उपयुक्त आहेत अशा अभिमन्यूंना मातृभाषा कळण्यापूर्वीच इंग्रजीचा फाजील आग्रह करीत आहोत. माहिती व तंत्रज्ञानाच्या व विकासाचे नावे हा साप-साप म्हणून भुई धोपटण्याचा प्रकार वाटतो. संगणकाच्या भाषेला मातृभाषेत आणण्याची क्षमता ज्या मुलांच्यामध्ये आहे, त्यांना मातृभाषा कळू न देण्याचे पाप आपण करीत आहोत असे वाटते. माणसाची ज्ञानग्रहणक्षमता ही संकल्पना-निर्मितीवर अवलंबून असते आणि संकल्पना-निर्मिती ही परकीय भाषेपेक्षा मातृभाषेतून असंख्य पटीने वाढते, असा शिक्षणसिद्धान्त असताना, आपणांस, आमच्या मुलांना (मातृभाषा) मराठी कळत नाही म्हणून सांगण्याची खोटी प्रतिष्ठा का प्राप्त व्हावी? जगातील अलौकिक दर्जाचे संशोधन व निर्मिती ही ज्याच्या त्याच्या मातृभाषेतून प्रथम निर्माण झाली आहे. रवींद्रनाथ टागोरांनी नोबेल प्राइझ मिळविण्यासाठी काव्यनिर्मिती केली नव्हती आणि त्यासाठी त्यांना बंगाली भाषा वगळून इंग्रजी भाषेत त्या दर्जाची निर्मिती करता आली नसती. संत ज्ञानेश्वराला, तुकारामाला व शिवाजीला सोडून शेक्सपिअर - मिल्टन - वेलिंग्टन आपले पूर्वज म्हणणारी पिढी घडविण्याचा आपला निर्णय काही आंतरराष्ट्रीय विचार नव्हेच नव्हे. तर त्याहीपुढे, 'हे विश्वचि माझें घर' म्हणणाऱ्या संत ज्ञानेश्वरांच्या मायबोलीस तुच्छ लेखणारी विकृत मनोवृत्ती उदयास न यावी ही प्रार्थना.

शिक्षणक्रमाच्या योग्यायोग्यतेबाबत, मुलांच्या शारीरिक व मानसिक विकासाशी शिक्षणक्रम सुसंगत नसल्यामुळे प्रा. पटवर्धन म्हणतात, "मुलाच्या मानसिक शक्तींचा मृत्यू आपणांस समजत नाही, दिसत नाही, त्याकरिता कोणी रडत बसत नाही, त्याच्या जन्माचे रूप बदलत जाऊन हरघडीस तो मरतच राहतो...... शिक्षणक्रमातून आमच्या पोरांना बाहेर काढणारे आम्ही किती दुष्ट

आहोत! किती मुलांची जीवितयात्रा कष्टप्रद केल्याचे पातक आमच्या माथ्यावर आहे!" मुलांच्या पालकांनी यासंबंधी शिक्षकांना विचारावे तर शिक्षक-पालकासंबंधी प्रा. पटवर्धन यांचे विचार अगदी आजसुद्धा दिशादर्शक ठरतात, "जेथे अंधळ्या-अंधळ्यांची गाठ पडली तेथे कोण कोणाला विचारणार आणि कोण कोणाचा जाब घेणार!"

सन २००० मध्ये, दिल्ली येथील एका संशोधन पाहणीमध्ये असे आढळून आले आहे की, भारतात ९५ टक्के तरुण मुलामुलींची शक्ती वाया जाते. याचे भाकीत एका शतकापूर्वी प्रा. पटवर्धन यांनी केले आहे. ते पोटतिडकीने म्हणतात, "आमच्या अज्ञानामुळे - हलगर्जीपणामुळे - बेपर्वाईमुळे आमच्या मुलांचे वाटोळे झालेले आणि हिंदमातेची लेकरे तिच्या कार्याला, तिचे पांग फेडण्याला निरुपयोगी झालेली पाहिली म्हणजे जीव कळवळून येतो आणि माझा मलाच संताप येतो. इतक्या पोरांचे मातेरे आमच्या हातून झालेले मला दिसत आहे.... माझे हातून त्यांचे बरे करण्याची खटपट होत नाही, मला त्यांची विपत्ती-शिक्षणविषयक विपत्ती अंशतःही दूर करता येत नाही, या विचाराने माझे डोके भणभणून जाते, आणि स्वतःचाच मला तिटकारा येतो..... जे मला खरे वाटते ते स्पष्टपणे ओकून टाकावे याबद्दल माझा राग करू नये."

वरील विचारांवरून, मुलांच्याबाबत हाडाच्या शिक्षकाची काय पोटतिडीक असते आणि शिक्षक कसा असावा याची आपणांस आजच्या काळातसुद्धा जाणीव होऊन आपली कानउघाडणी होते.

प्रचलित शिक्षणाने मुलांची कर्तृत्वशक्ती नष्ट होते, याची प्रचिती प्रा. पटवर्धनांना शतकापूर्वी येऊनसुद्धा आपण गेली १०० वर्षे मेकॉलेप्रणीत परीक्षांचा सांगाडा अंधळ्याप्रमाणे राबवीत आहोत. त्यात काही बदल व्हावा असे आपणांस का वाटू नये याचे आश्चर्य वाटते. त्यांच्याच भाषेत,

"आमच्या येथे युनिव्हर्सिटीच्या परीक्षेखेरीज दुसरे काही साध्य डोळ्यांपुढे नसल्यामुळे किंवा शाळांनी न ठेवल्यामुळे आमच्या शिक्षणात रुचिभेदाला, उद्देशभेदाला, सामर्थ्यभेदाला, व्यक्तिभेदाला वावच राहत नाही आणि आपला मुलगा संसारास प्रारंभ करण्याच्या वयात आला तरी आपण कोण होणार आणि काय करणार हे ठरविणे त्याला कठीण होते. कर्तृत्वाचा नवीनपणा नष्ट होतो. परस्वाधीनता फार वाढते आणि आम्ही सर्वस्वी पंगू, मुके, अंधळे, पांगळे आणि थोटे या वर्गात साजण्यासारखे बनतो.... अंगमेहनतीचे काम करणे म्हणजे

वेळेचा दुरुपयोग करणे, अशी आमच्या मुलांची सध्याच्या शिक्षणक्रमातील परीक्षा आणि मार्कांनी समजूत झालेली असते. ती वाचन, पठण आणि श्रवण हाच वेळाचा सदुपयोग समजतात....."

मुलांच्या व्यक्तिमत्त्व - गुणवैशिष्ट्यांच्या अज्ञानामुळे गेल्या शतकात आपणांस कर्तृत्वसंपन्न व कर्तृत्वशून्य मुलांच्यामधील फरक कळलेला नाही असे प्रा. पटवर्धनाच्या लेखनातून जाणवते. आपल्या काही चुकीच्या संकल्पनांना त्यामुळे धक्का बसल्याशिवाय राहत नाही.

"चांगला मुलगा म्हणजे शांत, जागचे जागी बसणारा, विचारल्याशिवाय न बोलणारा, हातापायाचे व्यापार आवरून सांगितलेले ऐकून निमूटपणे करणारा, दिला मार खाणारा, कधीही तोंड वर न करणारा, इत्यादी....."

प्रा. पटवर्धन यांच्या मते चांगला मुलगा कोणास म्हणावे? "जो अतिशय द्वाड, अति चपळ, एका जागी कधी बसावयाचा नाही, ज्याचे हात, पाय, डोळे, कान, जीभ वगैरे सर्व नेहमी चालू असावयाची, आपल्या खटपटींनी आणि उपद्व्यापांनी जो आपल्या सर्व वडील माणसांस बेजार करून सोडतो, कोणताही पदार्थ, कोणतीही चीज ज्याचे तडाख्यातून धडपणे सुटावयाची नाही, जो घटकेत दहादा पडेल आणि शंभरदा अडमडेल, राग, त्रास, आनंद, दुःख, प्रेम, द्वेष, माया, अभिमान इत्यादी मनोविकार जो मनात आणि तोंडावर एकसारखी पाठशिवाशिवी चालवीत असतील .... हरयुक्तीने आपल्या मनातले सिद्धीस नेल्याशिवाय ज्याला चैन पडावयाचे नाही, इत्यादी....."

भारतात आजपर्यंत, अशा चांगल्या व कर्तृत्वसंपन्न मुलांनाच अज्ञानापोटी उलटे टांगून मिरचीचा धूर देण्याइतपत अत्यंत निर्दयपणे शिक्षा दिल्या गेल्या आहेत. बंडखोर व धडपडणारी मुले ही राष्ट्राची अति मौल्यवान संपत्ती आहे, हे आपणांस कळणार कधी? जगातील सर्व कल्पक-प्रतिभावंत मुलांची ही लक्षणे असतात, याची आपणांस जाणीव नसल्यामुळेच भारताचे सर्वांत जास्त, मनुष्यबळाचे नुकसान त्यामुळे झाले आहे.

यातूनच व या विचारातून, शिक्षणाच्या अतिबोजड व क्लिष्ट कुणालाही न समजेल अशा व्याख्या करण्यात कोणतेही तथ्य नाही हे सिद्ध होते, कारण आपणांस मुलांच्या सुप्त शक्तीचे नियोजन करण्यात आलेले अपयश. म्हणून शिक्षणाची सर्वांत सोपी व्याख्या अशी करता येईल की जिचा अर्थ सर्वांना कुणालाही कळू शकेल.

"शिक्षण म्हणजे मुलामुलींच्या सर्व शक्तींचे योग्य नियोजन." मग त्या दृष्टीने मुलामुलींचे व्यक्तिमत्त्व घडविण्याच्या ज्या काही उपाययोजना असतील त्यांची अंमलबजावणी करण्याचे प्रयत्न काही प्रमाणात शासकीय तर काही प्रमाणात स्वयंसेवी संस्था घडवून आणू शकतात. मोडणारास जोडणारा बनविणे हे निसर्गाचे तसेच शिक्षणाचे काम आहे. मोडलेले जोडण्यात किंवा नवे करण्यात मुलांना आनंद वाटला पाहिजे अशा पद्धतींचा त्यात शोध घेता येईल.

ब्रिटिशांचे शासन जाऊन आपले शासन आले तरी आपले ध्येयधोरणात्मक निर्णय व प्रवृत्ती बदलल्या नाहीत. सन १८८१ पासून आजपर्यंत अनेक आयोग नेमून त्यांनी केलेल्या शिफारशींप्रमाणे बदल झाले नाहीत याची प्रमुख कारणेसुद्धा नवीन शैक्षणिक धोरणावरच्या मूळ इंग्रजी अहवालात पुढीलप्रमाणे स्पष्ट झाली आहेत :

१) Vested interests (प्रस्थापित हितसंबंध)
२) Lack of awareness of the defects (दोषांची जाणीव नसणे)
३) Lack of will to change (बदलासाठी इच्छाशक्ती नसणे)
४) Lack of courage to introduce drastic change (निर्णायक बदलासाठी लागणारी धमक नसणे.)
५) Lack of resources and administrative support (साधनसामग्री आणि प्रशासकीय पाठबळ नसणे.)

वरील प्रकारच्या कारणांचा विचार केला तर आपली मती कुंठित होऊन कल्पनाशक्ती लुळी पडते व प्रयोगशीलतेला खीळ बसते.

प्रा. पटवर्धन यांनी १०० वर्षांपूर्वी जसा विचार केला होता तसाच संशोधनात्मक विचार तंतोतंत सध्या सुसंगत होतो याचे सात्त्विक समाधान आम्हांसारख्या संशोधकांना लाभते; परंतु हे समाधान सात्त्विक संतापाच्या पोटी निर्माण झाले आहे.

पुढील एकविसाव्या शतकात, जगातील सर्वांत जास्त पदवीधर भारतात असतील, याचे आपणांस सात्त्विक समाधान लाभणार नाही कारण गुणवत्ता-विकासाचा (Qualitative Development) अभाव व तरुणांच्या शक्तीच्या नियोजनाचा अभाव. त्याचप्रमाणे संख्यात्मक पातळीवर (Quantitative Approach) सर्वांना सक्तीचे व मोफत शिक्षण करूनसुद्धा सर्वांत जास्त निरक्षर भारतातच असणार आहेत. याचा आपणांस सात्त्विक संताप वाटतो. अशा

प्रकारची समाधानकारक नसलेली अवस्था पाहून मुंबई विद्यापीठाचे भूतपूर्व कुलगुरू व आंतरराष्ट्रीय कीर्तीचे थोर विचारवंत आपल्या 'शिक्षण चित्र' ग्रंथात प्रा. पटवर्धनांच्या निष्कर्षाप्रत पोहोचल्याचे आढळून येते. जगातील सर्व उपयुक्त नवनिर्मिती शासनाकडून होण्यापेक्षा खाजगी स्वयंसेवी व वैयक्तिक प्रयत्नातूनच झाली आहे. जास्तीत जास्त नवीन शोध हे वैयक्तिक अथक परिश्रमातून लागले आहेत. प्रा. पटवर्धन विसाव्या शतकाच्या सुरुवातीस ज्या निर्णयाप्रत पोहोचले होते तसाच अनुभव प्रा. राम जोशी यांना विसाव्या शतकाच्या अखेरीस आला हे त्यांच्याच शद्बांत आपल्या अनुभवास येईल :

"मला तर देशातली शिक्षणव्यवस्था हळूहळू पण निश्चितपणे कोसळते आहे असं दिसतंय ..... जे काही करायचं ते शासनामार्फत किंवा शासनाने ठरवून दिलेल्या नियमांच्या चौकटीत राहून, त्यामुळे प्रत्येकजण नियमांच्या जंजाळात अडकून पडला आहे आणि आपली उपक्रमशीलता व सर्जनशीलता हरवून बसला आहे .... त्यासाठी प्रचलित दृष्टिकोनात आमूलाग्र बदल करावा लागेल. प्रथम शासनाला आपले अग्रस्थान सोडावे लागेल, ते अशा व्यक्ती आणि संस्थांकडे सोपवावे लागेल की, ज्यांचेकडे कल्पना आहेत, सामाजिक दृष्टी आहे, पोटतिडीक आहे, आणि शासनाला त्यांच्या पाठीशी खंबीरपणे उभं राहावं लागेल."

अशाप्रकारे, प्रा. पटवर्धन यांच्या 'शिक्षण, शिक्षक व अभ्यासक्रम' या पुस्तकाच्या समीक्षणातून काही निश्चित स्वरूपाचे, दिशादर्शक व निर्णायक स्वरूपाचे धागेदोरे मिळू शकतात, असा विश्वास वाटतो. राष्ट्रातील मुलामुलींचे व्यक्तिमत्त्व संवर्धन करण्यात आणि राष्ट्राचे मनुष्यबळ वाढविण्यात त्यांचा उपयोग व्हावा ही सदिच्छा. या पुस्तकाचे प्रकाशन करणाऱ्या 'राज्य मराठी विकास' संस्थेचा अत्यंत आभारी आहे.

■

**एज्युकेशनल रीसर्च इन्स्टिट्यूट, पोसेवाडी, जिल्हा सांगली ४१५ ३०७**



अनुक्रमणिका







# भाषा - कागदावरून जिभेवर

सुमन वेलवलकर

जेवणाचे डबे पुरवण्याचा व्यवसाय करून त्यात चांगला जम बसवणाऱ्या एका यशस्वी महिलेची आकाशवाणीवर मुलाखत होती. उपक्रम नेहमीप्रमाणे स्वागतार्ह होता. पण मुलाखतीची जागा आणि घेणारी व्यक्ती समाजाच्या 'झिलई वर्गातले' असल्यामुळे त्याचे दडपण मुख्य बाईंवर आल्याचे स्पष्ट जाणवत होते. स्वतःचे शिक्षण झाले नाही म्हणून चरितार्थासाठी हा व्यवसाय निवडणारी ही कर्तृत्ववान स्त्री पदवीधर महिलेपुढे बोलताना अवघडली होती; तिच्यासारखे बोलण्याचा अनावश्यक प्रयत्न करत होती. आपल्या वाटचालीविषयी बाईंनी सांगितले आणि समाधानाने त्या म्हणाल्या, "मी माझ्या मुलींना शिकायला भाग पाडले. माझ्या मुली इंजिनीयर आहेत. मी त्यांना जमेल तसा अभ्यासाला वेळ दिला. मी अशी दिवसभर स्वैपाकघरात अडकलेली पण मुलींवर चांगले संस्कार केले." (सर्वसाधारण आशय).

आई आणि वडील दोघांनीही आपले कर्तव्य उत्तम पार पाडल्यावर मिळणारे फळ बाईंना मिळाले ही निश्चितच कौतुकाची गोष्ट होती. पण इथे बोलताना उच्चशिक्षितेच्या भाषेचा स्तर लक्षात घेऊन त्या म्हणाल्या, "मी मुलींना सतत 'काममग्न' ठेवलं. कार्यरत, कार्यमग्न, कार्यात व्यस्त हे छापील पर्याय कुठेतरी त्यांच्या कानावरून गेले असणार. मी मुलींना कधीही रिकामी ठेवायची नाही, सतत काहीतरी काम सांगायची इतकेसे गद्य त्यांना सजवावेसे वाटले आणि त्यातून चारित्र्यसंपन्न मुली घडवणाऱ्या आईच्या तोंडून अविवाहित मुलींना हे प्रमाणपत्र मिळाले.

भाषा जिभेवर आधी असते - फार मर्यादित रूपात ती कागदावर उतरते. कागदावरच्या भाषेचे 'जिभेने अनुकरण करणे' हे गुरूत्वाकर्षणाचा नियम उलटा करण्यासारखे आहे.

■

एफ ४४, सुंदरनगरी, ३०८, सोमवार पेट, पुणे - ४११ ०११.

**१. 'मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन'ची वर्गणी :**

वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. या त्रैमासिकाचे वर्षात चार अंक निघतात. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे :

वार्षिक वर्गणी - संस्थेला रु. १०० फक्त
व्यक्तीला रु. ७५ फक्त
परदेशातील व्यक्ती / संस्था २० डॉलर

**२. पैसे भरण्याबद्दल सूचना :**

वर्गणी प्रत्यक्ष रोखीने किंवा धनादेशाने देता येईल. कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ अधिक घालावी. धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी ते अवश्य लिहावे. पावती दिली जाईल. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता याचा उल्लेख करावा.

वर्गणी व तत्संबंधी पत्रव्यवहाराचा पत्ता : नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. दू. क्र. ४४८६०१५

**३. मागील अंक :**

'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) एखाद दुसऱ्या अंकाचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २०/-.

**४. प्रकाशने :**

या त्रैमासिकातील निवडक लेखांचे संपादित पुस्तक 'निवडक भाषा आणि जीवन' (किंमत रु. २००) परिषदेच्या कार्यवाहांकडे अथवा मेहता पब्लिशिंग हाऊसमध्ये मिळू शकेल. तसेच 'भाषांतरमीमांसा' हे पुस्तकही कार्यवाहांकडे अथवा प्रतिमा प्रकाशनाकडे उपलब्ध आहे.

**५. जाहिरातीसाठी दर :**

पूर्णपान ७५० रु., अर्धेपान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छा सूचना १०० रु., आवरण पृष्ठ तीन / चार ८०० रु. जाहिरात मराठीत असल्यास उत्तम, हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

R.N.I.नोंदणी क्रमांक : ०-४००४८/८३




मराठी अभ्यास परिषद

संपर्क
मराठी अभ्यास परिषद
३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५,
वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२.
(दू. क्र. ४४८६०१५)

अनुक्रमणिका






